


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






५३५१

म. सा. प. १९६५-६६

संपादक - श्री. के. क्षीरसागर

वर्ष ३८ अंक १५२ जानेवारी-मार्च ६५

" ३८ " १५३ एप्रिल-जुलै ६५

संपादक - के. नारायण काळे

वर्ष ३९ अंक १५४ - जुलै-सप्टेंबर ६५

" " " १५५ - ऑक्टो - डिसें. ६५

" ४० " १५६ - जाने. - मार्च ६६

" ४० " १५७ - एप्रिल-जून ६६

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३८
अंक १५१
जानेवारी-मार्च
१९६५

१५ मे १९६५

: संपादक :
श्री. के. क्षीरसागर

महाराष्ट्र-साहित्य-परिषद
टिळक-रस्ता, पुणे २

ले ख



प री क्ष णे



याशिवाय

वार्षिक इतिवृत्त, हिशोबपत्रके, साभार स्वीकार.

सूचना : प्रस्तुत अंकात दि. २७ जूनला भरणाऱ्या नियामक व साधारण सभांच्या सूचना आहेत.

# साभार–स्वीकार

## कथा

१. **करंदीकर अ. ज.**—विचित्रकथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३ रु.

२. **कुलकर्णी मो. ना.**—मातीच्या चुली, नरेंद्र प्रकाशन, पुणे ४; ३=४० रु.

३. **चोरघडे वामन**—वेला, भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ५ रु.

४. **जोशी महादेवशास्त्री**—भीमाची माधुकरी, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; १=५० रु.

५. **ठोकळ ग. ल.**—ठोकळ गोष्टी भाग ४, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ५ रु.

६. **दसनूरकर स्नेहलता**—मायावी, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; ४ रु.

७. **पाटील य. भि.**—खानदेशी लोककथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; १=५० रु.

## कादंबरी

८. **गाडगीळ अमरेंद्र**—प्रवासी राम (द्वि. आ.), ठोकळ प्रकाशन, पुणे २; २=५० रु.

९. **कवठेकर द. र.**—वाट पाहता लोचन, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; १५ रु.

१०. **नांगरे बलराम**—अपंगा, गं. रा. पाठक, ३ सदाशिव, पुणे २; ६ रु.

११. **बनहट्टी राजेंद्र**—अपूर्णा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ४ रु.

१२. **मराठे प्र. द.**—एक क्षणाचा पक्षी, भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ५ रु.

१३. **मोकाशी य. वा.**—प्रक्षोभ, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे २; ८ रु.

१४. **वेलणकर सुमति**—वावटळ, भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ६ रु.

१५. **साने गुरुजी**—दिगंबरराय, साधना प्रकाशन, पुणे २; ८० पैसे.

## काव्य

१६. **गोरे ना. ग.**—मेघदूत (अनुवाद), साधना प्रकाशन, पुणे २; १ रु.

१७. **घाटे वि. स.**—शिवरायाचा तानाजी (आर्या), जोशी लोखंडे प्रकाशन, पुणे २; २ रु.

१८. **पंडित भ. श्री.**—समग्र केशवसुत (सं.), व्हीनस प्रकाशन, पुणे २; १५ रु.

१९. **पंडित भ. श्री.**—रेंदाळकरांची कविता (सं.), विदर्भ मराठवाडा बुक कं., पुणे २; ६ रु.

२०. **पाटणकर वा. वा.**—मराठी मुशायरा, पाटणकर वकील, यवतमाळ; ३=५०.

२१. **संत इंदिरा**—रंगबावरी, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=५०

## नाटक

२२. **अँड्र्यूज डी. पी.**—खाडिलकरांच्या नाट्यकथा, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३ रु.

२३. **गाडगीळ गंगाधर**—ज्योत्स्ना आणि ज्योति, सुविचार प्रकाशन, पुणे २; ५ रु.

२४. **तळवलकर गोपिनाथ**—शेक्सपियरच्या नाट्यकथा, वोरा अँड कं., मुंबई २; २ रु.

२५. **ढवळे वि. द.**—पेशवा पंतप्रधान, वि. द. ढवळे, पुणे ५; १=५०.

२६. **पेंडसे श्री. ना.**—राजे मास्तर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३ रु.

## चरित्र–आत्मचरित्र

२७. **गाडगीळ न. वि.**—पथिक (भाग १), व्हीनस प्रकाशन, पुणे २; १२=५०.

२८. **जोशी यशोदाबाई**—आमचा जीवनप्रवास, सौ. माणिकबाई भिडे, अमरावती; ८ रु.

२९. **जोशी एस. एम.**—बालपणच्या गोष्टी, साधना प्रकाशन, पुणे २; ८० पैसे.

३०. **देसाई वसंत**—म. ज्योतिराव फुले, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; २=५०.

[ कव्हर पान ३ पहा ]

## पुण्यातील सभासदांना विनंती

परिषदेत वेळोवेळी व्याख्याने, चर्चा, इत्यादी कार्यक्रम होत असतात. वर्तमानपत्रांतून सदरील कार्यक्रमांची आम्ही प्रसिद्धी देत असतो. पुण्यात परिषदेचे ५०० सभासद आहेत. त्यांना दरवेळी या कार्यक्रमांच्या पत्रिका छापून पोस्टाने पाठविणे परिषदेच्या आर्थिक परिस्थितीमुळे शक्य होत नाही.

तरी विनंती की परिषदेतर्फे होणाऱ्या कार्यक्रमांना उपस्थित राहण्यासाठी आपणास आगाऊ कळवावे असे पुण्यातील ज्या कोणा सभासदांस वाटत असेल त्यांनी कृपया आपली नावे परिषदेच्या चिटणिसांकडे लेखी कळवावी आणि छपाई व टपालासाठी वार्षिक १ रु. परिषदेत आणून द्यावा.

—चिटणीस

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३८, अंक १५२, १९६५

# संपादकीय

## भाषेचा प्रश्न आणि राष्ट्रीयत्व

हा संपादकीय मजकूर लिहिला जात असता, या प्रचंड देशाचे मन पाकिस्तानी आक्रमणाच्या वृत्ताने व्यग्र आहे. तथापि दोनच महिन्यांपूर्वी, म्हणजे प्रजासत्ताक दिनाच्या समारंभानंतर एका आठवड्यातच, आपले मन आपल्या या भारतद्रोही शेजाऱ्याच्या कृत्यांनी नव्हे, तर बुद्धिमत्ता आणि शान्तवृत्ती याबद्दल प्रसिद्ध असलेल्या, भारताच्याच एका प्रान्ताच्या, शोचनीय अत्याचारांनी व्यथित झाले होते. मद्रास राज्यात फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात जी जाळपोळ आणि जो विध्वंस, भाषाविषयक धोरणाच्या निमित्ताने करण्यात आला, व त्याच्या रूपाने आपल्या एकराष्ट्रीयत्वातील जी गुप्त फट उघड झाली, त्याचा धोका पाकिस्तानी शत्रुत्वापेक्षा यत्किंचितही कमी भयावह नाही. किंबहुना भाषामूलक फुटीरपणाचे जे अभद्र प्रदर्शन झाले, ते पाहूनच आमच्या हितशत्रूंना नव्या कारस्थानाकरिता अवसान चढले असावे, असे म्हटल्यास ती कविकल्पना मानण्याचे कारण नाही. ज्या फुटीरपणाचे मूळ राज्यव्यवहार-भाषेच्या प्रश्नात आहे, व ज्यांचे पर्यवसान अंशतः का होईना, देशाच्या दुष्मनांना बळ चढण्यात आहे, त्याचा विचार केवळ राजकीय पुढाऱ्यांनी आणि चळवळ्यांनीच करून भागणार नाही. किंबहुना निवडणूक जिंकण्यावरच ज्यांचे राजकीय आयुर्मान अवलंबून आहे त्यांनी हे प्रश्न सोडविल्यास, त्या प्रश्नांचे आयुष्यही त्या पुढाऱ्यांच्या आयुष्याबरोबर वाढण्याचाच संभव अधिक!

## या दंगली केवळ भाषामूलक होत्या काय?

मद्रास राज्यात झालेल्या दंगली केवळ भाषामूलक नसून, त्यांत राजकीय हेतू आणि आंतरराष्ट्रीय राजकारणातील कुप्रसिद्ध विध्वंसपद्धती यांचाच भाग अधिक होता असे हळूहळू उघडकीस आले आहे. 'त्यागभूमि' या तामीळ साप्ताहिकाचे संपादक श्री. सुब्बाराव यांनी सुमारे एक महिन्यापूर्वी जो अहवाल वृत्तपत्रांकडे पाठविला आहे, त्याचे सूक्ष्म परिशीलन केल्यास हा उद्वेगजनक निष्कर्ष काढावा लागतो. भारतीय राष्ट्रीयत्वाला आणि ऐक्याला विरोध करण्याबद्दलच ज्यांची ख्याती, अशा काही पक्षांनी व संस्थांनी देशविभजनाच्या अशुभ यत्नाचा केलेला एक प्रयोग, असेच या सर्व बंडाचे वर्णन श्री. सुब्बाराव यांच्या अहवालावरून तरी करावे लागेल. श्री. सुब्बाराव यांनी बंडाळीच्या सर्व ठिकाणांना स्वतः भेट देऊन माहिती गोळा करून हा अहवाल तयार केलेला होता हे निर्देशनीय आहे. पण राजकीय हेतूंचा व देशद्रोही गटांचा हात या राज्यव्यापी दंग्यांत मोठा होता, हे मान्य केले, तरीही हिंदी-विरोधाचे निमित्त, या राष्ट्रघातक उत्थानाला एवढे पथ्यावर पडावे, ही गोष्ट देखील कमी भयसूचक नव्हे.

## वैचारिक गोंधळ आणि वैचारिक विस्मृति

हिंदी भाषा विकसित आहे की नाही? ती इंग्रजी-सारख्या 'जागतिक' (?) भाषेचे स्थान घेऊ शकेल की नाही? दाक्षिणात्यांवर हिंदीची सक्ती करावी काय! इत्यादी प्रश्न जणू परवांच्या जाळपोळीमुळे नव्याने उत्पन्न झाले आहेत, असा भ्रम जेव्हा काही पुढारी व वृत्तपत्रकार पोटाशी कवटाळतात, तेव्हा "सार्वजनिक क्षेत्रात विस्मरणशीलतेचेच राज्य असते" अशा अर्थाच्या इंग्रजी म्हणीचे स्मरण होते. या विस्मरणप्रधान राजकारणात साहित्यिकांनी तरी डोके शान्त ठेवून कित्येक गोष्टींचे स्मरण करावयास हवे. हिंदी ही 'राष्ट्रभाषा' म्हणून संबोधण्याचा भाविक भोंगळपणा कित्येक लेखकांनी आणि पुढाऱ्यांनी अनेक वर्षे केला असला, तरी भारताची राज्यघटना तयार करणारे पुढारी अधिक वास्तववादी आणि तर्कककेश विचार करणारे होते. त्यांनी हिंदीला केवळ राज्यव्यवहाराच्या

भाषेचे पद दिले आहे व भारतातील प्रमुख राज्यभाषांना राष्ट्रभाषा मानले आहे. पण घटनेत निर्देशिलेली पंधरा वर्षे संपत आल्यावर अदूरदृष्टी इंग्रजीपूजकांनी मुख्य प्रश्नासंबंधी गोंधळ माजविला. हिंदीला राज्याभिषेक करण्याचा प्रश्न मुख्य नसून इंग्रजीसारख्या सर्वस्वी परक्या भाषेला पदच्युत आणि हद्दपार करण्याचा प्रश्न मुख्य आहे, याचेच काही लोकांना विस्मरण झाले. ते इतके की, इंग्रजीची बोळवण हा जणू हिंदीवाल्यांचा नवा कावा आहे, अशी कल्पना करून काही इंग्रजीभक्त कांगावा करू लागले. तसेच, हा वाद ' सर्व दक्षिण ' विरुद्ध ' सर्व उत्तर ' असा आहे, असाही भास वृत्तपत्रांच्या रकान्यांवरून तरी होऊ लागला. जाळपोळीच्या भडक प्रकाशात तर या रकान्यांचे प्रतिपादन अधिकच निर्विवाद वाटू लागले. तथापि जाळपोळ आणि शिव्याशाप शमल्यानंतर दक्षिणेतील सुविचारी आवाज ऐकू येऊ लागले. म्हैसूर राज्याचे 'राष्ट्रकवि' डॉ. कु. वें. पुटप्पा यांनी, राष्ट्रकविपदवीचा स्वीकार करताना ( जाळपोळीच्याच आठवड्यात ) केलेले भाषण अखिल भारताच्या मननाला पात्र आहे. आमच्या तरुण पिढीला, स्तनपानाच्या मिषाने विषप्राशन करावयाला लावणारी ' पूतना ' अशी त्यांनी इंग्रजीची संभावना केली आहे. "तमिळ अरसु कळ्हघम " चे अध्यक्ष श्री. ग्रामाणी याच्यासारखे तामीळभक्तही इंग्रजीचा आग्रह धरीत नसून, प्रथम मद्रास राज्यात ' तमिळ 'ला योग्य स्थान द्या, असा आग्रह धरीत आहेत. स्वतः राजगोपालाचार्य ( राजाजी ) यांनीही १९३८ साली ' हिंदी तेलगू स्वबोधिनी ' या पुस्तकाला जी प्रस्तावना लिहिली आहे तिजमध्ये हिंदीचा आग्रहाने पुरस्कार केलेला आहे. स्वभाषेच्या राज्याखेरीज स्वराज्य हे पूर्ण स्वराज्य नव्हे, हे आपल्या सर्व पुढाऱ्यांचे स्वातंत्र्य मिळेपर्यन्त तरी ठाम मत होते.

## दुर्दैवाची गोष्ट

दुर्दैवाची गोष्ट म्हणजे, ' सरकारी व्यवहारातून व विद्यापीठांतून इंग्रजी गेल्यास आपले कसे होणार ? ' या भयाने आज कित्येक लोक स्वभाषेसंबंधीची स्वातंत्र्यपूर्व प्रतिज्ञाही विसरून जात आहेत. हिंदीचे दोष वा हिंदीस्वीकारातील अडचणी घोकता घोकता, ते ' इंग्रजी ही भारतीय भाषा नव्हे ', हेही विसरत आहेत ! इतकेच नव्हे, तर स्वतःच्या प्रांतातही स्वभाषेचा वापर करण्याचे विसरत आहेत. ज्यांनी स्वातंत्र्य संपादिले त्यांचा भर राष्ट्रीयत्वावर, तर जे स्वातंत्र्य भोगू लागले, त्यांचा भर ' राजकीय प्राप्तीच्या अर्ध्या वाट्यावर ', असा हा प्रकार दिसतो. हा प्रश्न केवळ कारभाराच्या वा विद्यापीठांच्या तात्पुरत्या सोयीचा नसून ' राष्ट्रीयत्वा'चा म्हणजेच राष्ट्राच्या स्वत्वरक्षणाचा आहे, ही गोष्ट आज राजकीय चळवळ्यांना साहित्यिकांनीच सुनविली पाहिजे. राजकीय स्वातंत्र्य हे ' साध्य ' नसून ' साधन ' आहे, हे सत्य राजकारणी लोकांच्याही पुष्कळदा ओठावर असते; परंतु ' ते कशाचे साधन ? ' म्हणून विचारले, तर राजकारण्यांचे उत्तर बरोबर येईलच असे नव्हे. स्वातंत्र्य हे ' समाजवादी समाजरचनेचे साधन ' असेच उत्तर राजकीय गोटातून येण्याचा संभव अधिक ! प्रत्येक राष्ट्राला काही व्यक्तिमत्त्व आहे व त्या राष्ट्रीय व्यक्तिमत्त्वाचे रक्षण करणे हे जागतिक संस्कृतीच्या सम्पन्नतेलाही आवश्यक आहे, हा विचार राजकारणी लोक आर्थिक समाजवादाच्या उत्साहात पुष्कळदा विसरतात. राजकीय, शैक्षणिक आणि सांस्कृतिक व्यवहारात परभाषेला गीर्वाण भाषेचे स्थान देण्यात, या राष्ट्रीय व्यक्तिमत्त्वाचाच घात आहे, ही गोष्ट इंग्रजीपूजक लोक अधिकारलालसेमुळे विसरत आहेत, असे स्पष्ट सांगण्याची वेळ आली आहे.

## काही साहित्यिकांचीही दिशाभूल

या भाषिक वादळाच्या प्रकरणी केवळ राजकारण्यांचे ठराव व उठाव महत्त्वाचे न मानता, चौदा भाषांतील साहित्यसंस्था व साहित्याग्रणी यांनाही एकत्र आणून निर्णय घ्यावा, असे एका इंग्रजी दैनिकाने काही आठवड्यांमागे सुचविले होते. पण मराठीकरण, भाषिक प्रांत, संयुक्त महाराष्ट्र इ. घोषणा केल्यानंतर, साहित्यिकही स्वतंत्र राष्ट्रातील स्वभाषेचे स्थान विसरत आहेत की काय, अशी शंका येऊ लागली आहे. आमचे मित्र प्रभाकर पाध्ये यांचा, गेल्या मार्चच्या सत्यकथेतील, मूलतः विचारप्रवर्तक, परंतु अन्ती भलत्या वळणावर गेलेला लेख, या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. एकभाषित्व आणि एकराष्ट्रीयत्व यांचा गोंधळ न करण्याच्या दृष्टीने, पाध्ये यांनी केलेले विवेचन सर्वमान्य होण्यासारखेही आहे व अनेकांनी ते पूर्वी केलेलेही आहे. काही दृष्टींनी, हिंदीचा मराठीसारख्या भारतीय भाषांवर होणारा परिणाम इंग्रजीच्या परिणामाहूनही अनिष्ट होईल, हे त्यांचे म्हणणेही विचारवंतांना पटण्यासारखे आहे. ( मिरज साहित्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषणाचा बराच भाग हिंदीचे मराठीवर होत असलेले

दुष्परिणाम दाखवून देण्यात खर्ची पडलेला होता, हे येथे मुद्दाम नमूद केले, तर त्यातील हेतू लक्षात येईलच.) तथापि आजच्या मार्क्स् फ्रॉइड्-प्रधान युगात पुष्कळदा जे घडते, तेच पाध्ये यांच्या विवेचनाचे झाले आहे. विश्लेषण उत्कृष्ट; परंतु त्या विश्लेषणातून निघणारे अपरिहार्य निष्कर्ष मात्र पत्करण्याची तयारी नाही! हिंदीभाषिक केन्द्र-सरकार असण्याचे तोटे श्री. पाध्ये यांनी सूक्ष्मपणे हेरले व चितारले आहेत; पण हिंदीचा स्वीकार टाळायचा म्हटल्यास ज्या ज्या पर्यायांचा विचार करावा लागेल, ते ते मात्र त्यांच्या डोळ्यांसमोर नाहीत. हिंदीचा मराठीसारख्या संस्कृतोद्भव भाषांवर थोडाफार अनिष्ट परिणाम होईल हे दाखवून दिले की, इंग्रजीचा स्वीकार अपरिहार्य व विहित ठरतो, हा त्यांचा निष्कर्ष त्यांच्या विवेचनाच्या मानाने फारच एकांगी आणि अराष्ट्रीय ठरतो.

## तर्कप्राप्त पर्याय

वस्तुतः हिंदीच्या त्वरित स्वीकारात नेमस्त आणि 'आस्तेकदम' वृत्तीच्या लोकांना जी धास्ती वाटत आहे, ती घटनेत निर्दिष्ट असलेल्या तिच्या मर्यादित उपयोगा-संबंधीची नव्हे. 'आजच्या इंग्रजीची आणि कालच्या संस्कृतफारसीची जागा हिंदीसारखी अविकसित भाषा कशी घेणार?' ही त्यांच्या पोटातील खरी भीती आहे. अर्थात या भीतीचा अर्थ तरी आपण निर्भयपणे पाहिला पाहिजे. मराठी वा बंगाली यांच्यासारख्या अधिक विकसित भाषाही इंग्रजीची जागा घेण्यास पात्र नाहीत, हा या नेमस्त वा क्रांतिभीरू लोकांच्या म्हणण्याचा अर्थ आहे. याचा अर्थ परराज्यात आपण परकीय भाषेच्या अभ्यासात जेवढा वेळ घालवीत होतो व परभाषेवर जेवढे अवलंबून होतो, तेवढेच स्वराज्यातही राहणार! हिंदीच्या स्वीकाराने मराठी-गुजराथीतील शब्दसंग्रहावर, वाक्प्रचारावर व व्याकरणावरही जे जास्तीत जास्त परिणाम होऊ शकतील ते गृहीत धरल्यावरही इंग्रजीसारख्या परभाषेने होणारे सांस्कृतिक व भाषिक परिणाम कमी भयावह ठरत नाहीत. केवळ ज्ञानसाधन व राजकीय व्यवहाराची सोय म्हणून यूरोपीय भाषा स्वीकारणारे लोक, भाषा हे प्रत्येक समाजाच्या आत्माविष्काराचे साधन आहे ही गोष्ट कशी विसरतात, याचे आम्हाला राहून राहून नवल वाटते. हिंदीच्या आणि उर्दूच्या तोंडावळ्याची जी मराठी भाषा, तोंडी बोलीत का होईना, ग्वाल्हेर, इंदोर वा निजाम-हैद्राबाद येथे ऐकू येते, तिच्या द्वारेही आमचे मराठी अंतरंग जेवढे व्यक्त होते, त्याच्या शतांशही इंग्रजीच्या भाषांतरित उच्छिष्टावर जगणाऱ्या मराठीच्या द्वारे होऊ शकत नाही. आज दिल्लीत पंतप्रधानांनी वा संरक्षण-मंत्र्यांनी एखादे राष्ट्रीय महत्त्वाचे निवेदन केले, तर त्याच्या इंग्रजी तारांचे मराठी करताना चार वृत्तपत्रांत चार वेगळे सूर निघतात! कायदा, सरकारी घोषणा, रेल्वेवरील सूचना, या सर्वांचा मूळ अवतार इंग्रजी असल्याने, त्यांचे भारतीय भाषांतील रूप इतके बेंगरूळ व अर्थशून्य होते, की त्यापेक्षा मूळ इंग्रजी बरे वाटते. याला इलाज म्हणजे त्यांचा जन्म कोणत्यातरी भारतीय भाषेत होणे हा एकच. त्याशिवाय आमच्या भाषेतील आणि विचारांतील गोंधळ थांबणार नाही. प्रभाकर पाध्ये यांच्यासारख्या विचारांनी व वयाने ज्येष्ठ अशा साहित्यिकाने इंग्रजीला 'जन्मसावित्री' होण्याचा आशीर्वाद द्यावा, हे पाहून आमच्या डोळ्यांपुढे भारताच्या चौदा भाषांचे अखंड दुर्भाग्य दिसू लागले!

स्वातंत्र्यपूर्वकाळातील लोकांचे विचार यापेक्षा अधिक धीट आणि तर्कशुद्ध होते, असे म्हणावे लागते. त्या तर्कशुद्धतेप्रत आपणाला पुन्हा परतावयाचे असेल, तर गांधीजींचे या बाबतीतील विचार पुन्हा देशापुढे ठेवावयाला हवेत. या संदर्भात आम्हांला राजकीय विचारांत गांधीजींच्या अगदी दुसऱ्या टोकाला असलेल्या दोन विचारवंतांचे प्रतिपादनही अधिक तर्कशुद्ध वाटते. ते दोन विचारवन्त म्हणजे डॉ. लोहिया आणि डॉ. रघुवीर हे होत. बहुभाषिक सरकार (Multi-lingual Centre) असले तरी चालेल; तामीळ भाषेत सरकारी व्यवहार करायचे ठरले तरी पर्वा नाही; परंतु इंग्रजीतून राष्ट्रीय व्यवहार होण्यासारखी नामुष्कीची गोष्टच नाही, हे या दोघांचे प्रतिपादन लक्षात घेण्यासारखे आहे.

हा आग्रह या दोन साहित्यबाह्य विद्वानांनी धरावा, आणि साहित्यिकांनी मात्र भारतीय भाषांच्या जन्म-मरणाचा प्रश्न असता, इंग्रजीच्या सोयिस्करपणाकडे व सौष्ठवाकडे पाहात राहावे, ही गोष्ट आम्हांला चमत्कारिक वाटते. भाषिक प्रान्ताकरिता महाराष्ट्राने जो लढा दिला, तो स्वभाषेवर पाणी सोडण्याकरिता खास नव्हे. आणि महत्त्वाचे राजकीय आणि (शिक्षणासारखे) सांस्कृतिक व्यवहार इंग्रजीतूनच चालू ठेवणे म्हणजे इंग्रजीला उच्च वर्ण बहाल करून चौदा मातृभाषांना हीन वर्णांत ढकलणे होय.

## दाक्षिणात्य भाषांचे अध्ययन

अर्थात हिंदीची स्वीकृती ही इंग्रजीच्या स्वीकारासारखी एकतर्फी आणि केवळ व्यावहारिक सोयीची गोष्ट ठरता उपयोगी नाही. मुख्य ध्येय या बहुभाषी, बहुरंगी, विराट देशाचे आन्तरिक ऐक्य ही असली पाहिजे. या बाबतीत अलीकडे भूतपूर्व राज्यपाल दिवाकर यांच्यासारख्या एका कर्नाटकस्थ मुत्सद्यानेच हाक दिली आहे. मद्रास राज्यातील भाषिक अत्याचारानंतर लिहिलेल्या एका लेखात श्री. दिवाकर म्हणतात :

"परदेशातील वकिलातीवर कोट्यवधी रुपये खर्चून परदेशाशी मैत्री जोडण्याचा खटाटोप करीत असता, स्वदेशातील प्रांताप्रांतांचे एकमेकांबद्दलचे अज्ञान दूर करून खरेखुरे राष्ट्रीय ऐक्य निर्माण करण्याकरिता मात्र आपण काडीचाही यत्न करीत नाही. असा यत्न करणे हे अत्यंत निकडीचे कर्तव्य आहे. सत्तेचाळीस कोटी हिंदवासि'पैकी प्रत्येक आत्मा अशा राष्ट्रीय एकात्मतेकरिता तडफडत आहे."

परलोकवासी सानेगुरुजी यांनी ही हाक भावनात्मक अन्तर्ज्ञानाने जणू अनेक वर्षांपूर्वी ऐकली होती! त्यांनी कल्पिलेल्या व नंतर पुणे येथील त्यांच्या चाहत्यांनी वाढीला लावलेल्या आन्तरभारती चळवळीत हेच भारतीय एकात्मतेचे ध्येय अन्तर्भूत आहे, आणि विशेष म्हणजे त्या ध्येयार्थ सक्रिय, वास्तववादी व विधायक कार्यक्रमही आहे. सानेगुरुजींच्या बऱ्यावाईट भावनाविकल वाङ्मयावर सुमारे वीस वर्षांपूर्वी जेव्हा काही टीकाकारांनी हल्ला चढविला, तेव्हा त्या वाङ्मयाचे समर्थन करणारे लोक, आज त्यांच्या आन्तरभारती कल्पनेतून भाषिक भांडणावर तोडगा काढण्याऐवजी, इंग्रजीच्या गळ्यात पडून त्यांच्या पवित्र स्मृतीला बट्टा लावीत आहेत ही गोष्ट फारच विपरीत वाटते!

या दृष्टीने पुण्याच्या आन्तरभारती कार्यालयाने मात्र हे आन्तरप्रांतीय बेदिलीचे आव्हान स्वीकारून यंदा एक धीट पण समयोचित, विधायक कार्यक्रम हाती घेतला आहे. पर्वतीजवळील सानेगुरुजी स्मारकाच्या जागेत, आन्तरभारतीतर्फे या महिन्यात तामिळ भाषाशिक्षणाचे शिबिर भरविले जात आहे. पुढील वर्षी शिबिरातील हीच तुकडी तामिळनाडमध्ये महिनाभर प्रत्यक्ष मुक्काम व श्रमदान करून तेथील जनतेशी समरस होण्याचा योग साधील; व तिसऱ्या वर्षी तेथील साहित्याचा व संस्कृतीचा अधिक अभ्यास करील. हिंदुस्थानच्या चारी कोपऱ्यांत थोडेफार वास्तव्य केल्याखेरीज खरा भरतखंड समजू शकत नाही, हे दयानंद, विवेकानंद व गांधीजी यांच्यासारख्या 'भावनांच्या पुढाऱ्यां'नी ओळखले होते. दयानंदासारख्या गुजराथेत जन्मलेल्या संस्कृत पंडिताने (केशवचंद्रांच्या सल्ल्यावरून!) अखेर हिंदीचा आश्रय करून आपले धर्मसुधारणेचे तत्त्वज्ञान जनतेपर्यंत नेले. विवेकानंद हिमालयापासून मद्रासत्रावणकोरपर्यंत, अज्ञात बैराग्याप्रमाणे पायी भटकले. गांधीजींनी आपल्या लाखलाखांच्या सभांतून सोप्या व्यावहारिक हिंदुस्तानीचा वापर करून स्वराज्याकांक्षा झोपडीपर्यंत नेली. पण सर्वसामान्य सुशिक्षित मनुष्याला, इंग्रजीच्या पडवीलाच बसून राहिल्याने, पंजाब, बंगाल, आंध्र वा केरळ यांच्या अन्तर्गृहांत कधीच प्रवेश मिळत नाही. आपणांला भेटतात ते त्या त्या प्रांतातले देशी साहेब! या दृष्टीने आन्तरभारतीचा हा प्रयत्न राष्ट्रीय महत्त्वाचा असल्याने प्रत्येक राज्यातील साहित्यसंस्थेने हाती घेण्यासारखा आहे. वाङ्मयीन तंत्राच्या प्रयोगापेक्षाही हे भाषिक प्रयोग अधिक महत्त्वाचे आहेत, हे आमच्या साहित्यिकांनी ध्यानी घेतले, तरच आजच्या राष्ट्रीय आणीबाणीत त्यांनी आपली खरी भूमिका केल्यासारखे होईल.

## यंदाचा केतकर स्मृतिदिन

महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या वतीने साजऱ्या होणाऱ्या केतकर स्मृतिदिनात, केतकरांच्या समाधीला पुष्पांजली अर्पण करणे, हा कार्यक्रम प्रमुख असून, तो गेली २८ वर्षे नियमितपणे होत आहे. या सकाळच्या कार्यक्रमाखेरीज संध्याकाळी सभेचाही कार्यक्रम अलीकडे नियमितपणे होत असे. यंदा सकाळचा कार्यक्रम दरसालसारख्या अनौपचारिक प्रणामविधीनेच साजरा झाला असला, तरी त्यालाही एक विशेष महत्त्व प्राप्त झालेले होते. एरंडवणे येथील उद्यानात उभे राहात असलेले साधे-सुबक केतकरस्मारक यंदा दोन संगमरवरी शिलांसह पूर्ण झालेले होते; व त्याचे समाधान उपस्थितांच्या आणि कार्यकर्त्यांच्या मुखावर दिसत होते. या कामी साहित्यप्रेमी इंजिनियर श्री. ग. म. ऊर्फ अण्णासाहेब आपटे यांनी स्वखर्चाने हे स्मारक उभारल्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

## संध्याकाळची कोश-कार्य-चर्चा

सकाळच्या या कार्यक्रमाप्रमाणेच संध्याकाळचा यंदाचा कार्यक्रमही दरसालपेक्षा वेगळा व विशेष होता. यंदा केवळ स्मृतिपर व्याख्यान न ठेवता, परिषदेच्या चालकांनी मराठीतील विद्यमान कोशकार्यकर्त्यांचे एक सम्मेलन भरवून त्यात एक बहुमोल चर्चा घडवून आणली. कोल्हापूर येथील अभिनव ज्ञानकोशाचे श्री. भिडे, पुणे येथील भारतीय संस्कृतिकोशाच्या सौ. पद्मजा होडारकर व सौ. सुलोचना लिमये, तत्त्वज्ञान कोशाचे श्री. दे. द. वाडेकर, यांसारखे अनेक अनुभवी कार्यकर्ते या चर्चेत सहभागी झाल्याने, जवळजवळ तीन तास चाललेली ही चर्चा फारच उपयुक्त ठरली. कोशकार्याला मुख्य अडचणी दोन असल्याचे या चर्चेत निष्पन्न झाले. पहिली द्रव्याच्या निश्चितीची; व दुसरी तज्ज्ञ सहकाऱ्यांची. या दोन महाविघ्नांतूनही कोश-कार्यासारखे दुष्कर कार्य करण्यास शेकडो विद्वान महाराष्ट्रात पुढे येतात, ही गोष्ट महाराष्ट्राच्या महामनस्कतेची द्योतक होय. तथापि या दोन अडचणींनी ‘ कार्य अडून राहते ’ एवढेच नव्हे, तर ते पुष्कळदा वायाही जाते, ही गोष्ट राष्ट्रीय चिंतेचा विषय होण्यासारखी आहे.

## विधायक कल्पना आणि आत्मपरीक्षण

या चर्चेतून केवळ गाऱ्हाण्यांनाच वाचा फुटली असे नव्हे. दोन विधायक कल्पनाही पुढे आल्या. त्यांतील मध्यवर्ती संदर्भग्रंथालयाची कल्पना सर्वांत महत्त्वाची, सर्वांत उपयुक्त आणि तितकीच व्यवहार्यही होय. ही कल्पना परिषदेच्या कार्यकर्त्यांच्या डोळ्यांपुढे गेली तीन चार वर्षे आहे. अशा व्यवहार्य आणि सर्वोपयोगी सूचनेला सरकार व धनिक यांच्याकडून विनाविलंब आणि विनावाद द्रव्यसाहाय्य मिळण्यास अडचण पडू नये. कोशकार्य-कर्त्यांची एक मध्यवर्ती संघटना असावी अशीही एक सूचना पुढे आली. भिन्न भिन्न कोशकर्त्यांच्या कार्यसीमा विवाद्य नसतील, तर ही कल्पनाही यशस्वी आणि मधुरफलदायी होईल. कोशकार्यासारख्या चिरस्थायी ज्ञानसेवेत कार्याची पुनरावृत्ती वा शक्तीचा अपव्यय न व्हावा, ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. त्याकरता केवळ संघटना-स्थापनेने भागण्यासारखे नसून, आत्मपरीक्षण आणि आत्म-विस्मृती यांचीही गरज लागणारी आहे. या चर्चेत निश्चित आणि सार्वत्रिक परिभाषेचा प्रश्नही श्री. मो. ज्ञा. शहाणे यांनी पुढे मांडला. हिंदी कोशकर्ते विरुद्ध इतर भाषांतील कोशकर्ते हा वाद श्री. श्रीपाद जोशी यांनी ऐकविला. पण अन्य प्रांतांतील हिंदीचा प्रसार म्हणजे दशमुखी रावणाचा अवतार होऊन चालणार नाही, असा हिंदी भाषिक विद्वान आग्रह धरीत असतील, तर आपण केवळ तक्रार करण्याऐवजी त्याचा गंभीरपणे विचार करावयास हवा, असेच आम्ही तरी म्हणू ! उद्याची हिंदी, बोजड पांडित्यप्रचुर नसावी, असा आमचा आग्रह असला, तरी ती धेडगुजरी न बनता आपल्या ‘ स्व-भावा ’तच वाढावी व इतरांनी ती स्वीकारावी, असाही आम्ही हिंदी-प्रेमामुळेच आग्रह धरू.

परवाच्या कोशकारमेळाव्यातूनच कोशकारसंघटना व संदर्भग्रंथालय या दोन्ही संस्था जन्म पावतील अशी आम्ही आशा करतो !

• • •

अनुक्रमणिका

# साहित्य चर्चा मंडळ

[ साहित्य चर्चा मंडळ हा महाराष्ट्र साहित्य परिषदेचा एक नवा उपक्रम आहे. ललित साहित्यकृती, साहित्य कलाविषयक प्रश्न, आणि या क्षेत्रातील इतर महत्त्वाचे विषय, यांवर छोटी टिपणे वाचावयाची आणि त्यांवर अनौपचारिक चर्चा करावयाची, अशी या उपक्रमाची बैठक आहे.

साहित्य चर्चा मंडळाची पहिली सभा दिनांक १७ डिसेंबर १९६४ रोजी झाली. तीत या उपक्रमाचे स्वरूप आणि साध्य काय असावे, याबद्दल मोकळ्या मनाने विचार-विनिमय होऊन, त्यानंतर प्रा. क्षीरसागर यांनी, " मराठीत रूढ होऊ पाहणारे नवे वेंगरूळ भाषाप्रयोग " हे आपले टिपण वाचले व त्यावर चर्चा झाली. प्रमुख मराठी वृत्तपत्रे, विशेषतः पुण्या-मुंबईची लोकप्रिय दैनिके, त्यांनी आपल्या विवेचनातील उदाहरणांसाठी आधाराला घेतली होती. प्रा. क्षीरसागरांचे हे टिपण लवकरच प्रसिद्ध होईल अशी अपेक्षा आहे.

दुसरी बैठक, जॅन्युअरी २१ सन १९६५ रोजी झाली. तीत श्री. रा. चिं. ढेरे यांनी, " वीर व त्यांचे पवाड " व श्री. के. नारायण काळे यांनी, " मोट "–लेखक आनंद यादव. (सत्यकथा : दिवाळी अंक, १९६४) यावरील आपली टिपणे वाचली.* तिसरी बैठक दि. १८ फेब्रुअरी १९६५ ला होऊन तीत डॉ. रा. ग. हर्षे यांनी, " फ्रेंच लोकगीते " व डॉ रं. वि. देशपांडे यांनी, " दवणा "–लेखक विद्याधर पुंडलीक. (सत्यकथा : दिवाळी अंक १९६४) ही टिपणे वाचली. डॉ. हर्षे यांच्या टिपणाच्या विषयाचा व्याप फार मोठा असल्यामुळे टिपणाच्या स्वरूपात तो सीमित करणे कठीण झाले. डॉ. देशपांडे यांचे टिपण रसग्रहणात्मक असून बरेच विस्तृत होते. परंतु पत्रिकेच्या मर्यादित पृष्ठसंख्येच्या बंधनामुळे ते समग्र न देता, डॉ. देशपांडे यांच्याच शब्दात, पण संक्षिप्त स्वरूपात, द्यावे लागत आहे. डॉ. देशपांडे आपुलकीच्या भावनेने त्याबद्दल क्षमा करतील असा भरवसा वाटतो.

---

**टीप** * दुसऱ्या बैठकीत वाचलेले श्री. ढेरे यांचे "वीर व त्यांचे पवाड" हे टिपण त्यांच्या लेखसंग्रहात प्रसिद्ध झाले असून श्री. काळे यांचे "मोट" या कथेवरील टिपण सत्यकथेच्या मार्च १९६५ च्या अंकात आले आहे.

चवथ्या बैठकीत, (दिनांक १८ मार्च १९६५) दोन टिपणे वाचण्यात आली. एक कवी वसंत बापट यांच्या, " अणूंची अळंभी उद्यांची जरी– " या कवितेवरील श्री. के. नारायण काळे यांचे आणि दुसरे, " कलेच्या आस्वादाचे स्वरूप " या विषयावरील प्रा. स. शि. भावे यांचे प्रा. भावे यांनी सूत्रमय भाषेत फार मोठ्या पल्ल्याचे आक्रमण केल्यामुळे त्यांच्या विषयाच्या मांडणीचा आवाका व त्यांनी वापरलेली पारिभाषा यांच्या आकलनात्मक प्राथमिक चर्चेतच बराच वेळ गेला. त्यामुळे त्यांचे सिद्धान्त व प्रमाणे यांवर विचारविनियम होण्यास वेळ उरला नाही. प्रा. भावे यांचे हे टिपण महत्त्वाचे आणि मूलगामी विचारांना चालना देणारे असल्यामुळे त्यातील वेगवेगळ्या भागावर पृथक चर्चा होणे इष्ट आहे, असे उपस्थित सदस्यांपैकी अनेकांचे मत पडले. त्याला अनुसरून त्यातील विविक्षित भागावर मंडळातर्फे यथाकाल चर्चेचे कार्यक्रम योजिले जातील. दरम्यान प्रा. भावे यांचे मूळ टिपण चिकित्सकांना त्याच्या मूळ स्वरूपात उपलब्ध होणे इष्ट असल्यामुळे तेही या अंकात प्रसिद्ध करण्यात येत आहे.

केवळ पुण्यातील महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सभासदांनाच नव्हे तर पुण्याबाहेरच्या आणि सदस्य नसणाऱ्याही साहित्यकलाचिकित्सकांना ज्यात सहभागी होता येईल असा हा उपक्रम आहे. लिहिलेली टिपणे वाचून त्यावर चर्चा करणे ही या कार्यक्रमातील मूलभूत कल्पना असल्यामुळे, त्याला एकप्रकारचे स्थायी स्वरूप आहे. साहित्य चर्चा मंडळाच्या बैठकीत वाचावयाच्या टिपणांबद्दल सर्वसाधारण अपेक्षा : ती केवळ वर्णनात्मक किंवा रसग्रहणात्मक असू नयेत; त्यांमधून मूलगामी तत्त्वचिकित्सेला आणि संशोधनाला उत्तेजन आणि अवसर मिळावा; आणि वाचावयाच्या टिपणाची लांबी, शक्यतो, ते वाचावयाला वीस मिनिटांहून अधिक वेळ लागू नये इतकीच असावी; अशा आहेत. आतापर्यंतच्या सर्वच कार्यक्रमांत या अपेक्षा काटेकोरपणे पूर्ण झाल्या आहेत असा दावा नाही; पण हळूहळू हे कार्यक्रम अधिकाधिक सुसूत्र आणि सुसंघटित आकार घेत जातील अशी आशा आहे. ]

# “ दवणा ”

( एक टिपण )

“ दवणा ” ही ग्रामीण परिसरातील एक लोककथा आहे. श्री. पुंडलिकांनी लिहिलेली लांडोबा पेंडोबांची कहाणीच म्हणाना. पण मी तिच्याकडे आकर्षित झालो, तो तीमधील कथाबीज आणि आशय यांतील आगळेपणामुळे.

“ दवणा ” ही विस्ताराने छोटी पण आशयाने मोठी अशी कथा आहे. तिच्यातील कथानायक एक सर्पराज आहेत. परंपरेने चालत आलेल्या तीनचार संकेत रज्जूंनी बद्ध होऊन, एका तरुण आणि अतिशय श्रद्धाळू स्त्रीच्या भाविक आणि भावुक जीवनात, आपल्या भावजीवनाचा सूर मिळवीत हे सर्पराज, एक अद्‌भुतरम्य आणि नितान्त-रमणीय असा, ‘ जनन-जननी ’ तत्त्वाचा गोफ विणीत असल्याचे तीत दाखविले आहे.

ही कथा एका स्त्रीची आहे. एका जननीची आहे. पहिले बाळंतपण माहेरी व्हावयाचे, ही परंपरेने चालत आलेली प्रथा डावलून मुद्दाम सासरी आणल्या गेलेल्या एका पहिलटकरणीची आहे.

“ वास्तुपुरुष आपल्या वास्तूचे आणि शिवारातील लक्ष्मीचे रक्षण करीत सर्परूपाने हिंडत असतो, इतकेच नव्हे तर आपला वंशविस्तार अबाधित राहावा म्हणून प्रत्येक पिढीला पुनः पुन्हा जन्म घेत असतो ” ही या कथेची मध्यवर्ती कल्पना. परंपरेने रूढ असलेल्या या कल्पना-प्रवाहाला आणखी तीनचार सांकेतिक स्वरूपाच्या कल्पना-प्रवाहांची जोड देऊन ही कथा लेखकाने प्रवाहित ठेविली आहे.

(१) नागसाप स्त्रीच्या स्वप्नात येणे, ही ती स्त्री गर्भवती असल्याची, तिला ‘ दिवस चढले ’ असल्याची, खूण.

(२) वारंवार स्वप्नात येणाऱ्या त्या नागाची आणि त्या स्त्रीची प्रत्यक्ष दृष्टादृष्ट होणे, आणि अशी दृष्टादृष्ट झाल्या-बरोबर त्या नागाला अंधत्व येणे.

(३) हे अंधत्व ती स्त्री बाळंत झाल्यावर ज्या पाण्याने नहाते त्या पाण्यात स्वतःला न्हाऊन घेतल्यावर नष्ट होणे.

(४) त्या मातेच्या दृष्टिपथातून त्या सर्पाने तिच्या कुशीत जन्माला येऊ घातलेल्या गर्भाला न्याहाळणे— म्हणजेच गर्भावर त्याची सावली पडणे.

(५) हा सर्परूपी वास्तुपुरुष जिथे जिथे जाईल तिथे तिथे दवण्याचा घमघमाट सुटणे.

हे ते संकेत.

कौसल्यामाई गर्भवती असताना, ती जाईल तेथे दवण्याचा घमघमाट सुटत असे. रामजन्माचा आणि दवण्याचा हा अन्योन्य संबंध आपल्याला माहीत आहेच. “दवणा ” हे या कथेचे नाव किती यथार्थ आहे, हे त्यावरून दिसून येईल.

ही यशोदेची कथा, तिच्या पतीची—यशवंताची, मात्र एक व्यथा होऊन बसते. यशवंत हा एक नागच्या पिढीतील तरुण. पक्का नास्तिक आणि पिसारी टाळक्याचा. नौकरी-साठी शहरात राहिलेला. ज्या सर्पाला त्याची पत्नी वास्तु-पुरुष म्हणून समजते, देवसर्प म्हणून मानते, त्याला तो मात्र एक भयंकर विषारी सर्प म्हणूनच समजतो. त्याला हुडकून काढून ठेचण्याच्या हेतूने तो सारे शिवार पालथे घालतो. यशोदा मात्र आपल्या अंतर्मनात एक निराळीच अद्‌भुतरम्य भावसृष्टी निर्माण करून तिच्यात सदा रममाण झालेली असते. निर्भयपणे सगळीकडे वावरत असते. यशोदेचा तो शांत आणि सात्त्विक स्वभाव, ते निरागस हास्य, खोल खोल आतून कुठून तरी येत असल्याची यशवंताला पुरेपूर जाणीव झालेली असते.

“ ही मुलगी आयुष्यभर आपल्याला न कळणाऱ्या अशा एका वाटेने सतत जात राहणार; अन् कसला तरी, तिचा तिलाच ठाऊक असलेला अर्थ घेऊन परत येणार; आपण फक्त तिच्या आतल्या बाहेरच्या येरझारा पाहायच्या! अखेरपर्यंत ती परकीच राहणार आपल्याला. तिच्या रूपाने आपल्या आयुष्यात काय आले आहे तरी काय ? ”

या परिच्छेदावरून यशवंताची मनोव्यथा स्पष्ट होते.

पतिपत्नीच्या या दोन परस्परविरोधी प्रवृत्तींमधील हा संघर्ष समस्या निर्माण करणारा आहे. ‘ यशोदेची स्वप्ने खरी, तिचे आंतरिक जीवन खरे का आपली जाग खरी. ’ याचा यशवंताला संभ्रम पडतो.

या कथेत कथानक असे फारसे नाहीच. तीत लेखकाने एका असाधारण भावविश्वाचा मनोविश्लेषणात्मक विकास घडवून आणलेला आहे. विशेषतः यशोदेच्या मनातील आंदोलने, आणि त्यांच्या नेणिवेतील जाणिवा साकार करताना लेखकाने निसर्गाच्या स्पंदनांच्या लयीत चालणाऱ्या माणसांच्या स्पंदनांच्या लयीचे जे दर्शन घडविले आहे, ते मोठे कलात्मक आणि देखणे आहे. गूढविश्वदर्शनाच्या या अंतर्पाटाला, पिवळ्या, हिरव्या रंगाच्या आणि दवण्याच्या पोपटी ढंगाच्या ज्या मेहेरपी आणि वेलबुट्या, लेखकाने काढल्या आहेत त्या सौंदर्यवाही आणि आशयपूर्ण आहेत.

‘ काळ्या चकत्यांची खडी काढलेल्या जर्दा रंगाचा ’ हा सर्पसम्राट, त्या वास्तूचा स्वामी, वास्तूच्या आड्याला ज्या तुळवटांवरून आणि कड्यांवरून संचार करीत असतो, ते सारे पिवळेच असते. पिवळ्या शेवंतीची फुले, पिवळ्या धान्याच्या देवघरात वस्ती ठोकून राहिलेली पिवळीधमक नाग-मूर्ती, विहिरीजवळील डोणीच्या स्फटिकवत पाण्यामध्ये, प्रातःकाळच्या उन्हाच्या कवडशामुळे तयार झालेल्या

अनुक्रमणिका

पिवळसर वाटोळ्या चकत्या, इतकेच काय, स्वप्नात पाहिलेल्या मावशीच्या लुगड्याचा रंगही पिवळा सोनसळी— इथूनतिथून पिवळ्या रंगाची केलेली ही बरसात—हिरव्या आणि पिवळ्या रंगाच्या मिश्रणानेच दवण्याचा गहिरा पोपटी रंग तयार होत नाही काय? नाही म्हणायला, सकाळच्या प्रहरी विहिरीवरून उन्हे थोडीशी पुढे सरकल्यावर, रोज नियमितपणे येऊन बसणाऱ्या त्या पक्षाच्या पिसांची कापसाच्या बोंडासारखी थरथरून उमलणारी आतली ती लुसलुशीत पांढरी पर आणि त्यावरील काळ्या मखमलीचे अंग; तसेच गुरविणीने केलेल्या तेलवातीतील उजेडाच्या मर्मस्थानी प्रकाशमान होणारा एक निळा थेंब, या आणखी दोनतीन रंगाच्या शिडकाव्यांनी मूळच्या पोपटी रंगाला एक आगळा आणि सुस्पष्ट उठाव आलेला आहे.

यशोदेच्या एक प्रकारच्या विलक्षण मानसिक अवस्थेच्या पातळीतून ही कथा साकार होत असताना त्या प्रक्रियेमागील ज्या विशाल तत्त्वप्रणालीचा शोध घेण्याचा मोह मनाला अनावर होतो, ती म्हणजे, जननी आणि जनन तत्त्वाचे एक गूढ आणि गुंतागुंतीचे कोडे! जनन आणि जरावस्था : उत्पत्ती आणि लय यांचे रहाटगाडगे...याच जोडतत्त्वामध्ये, कुळकर्ण्यांच्या घराण्याचा वास्तुपुरुष प्रत्येक पिढीला नव्याने जन्म घेत असतो. या संकेताची लेखकाने यशोदेच्या श्रद्धाळू अंतःकरणाच्या धाग्यातून मोठ्या कलाकुसरीने गुंफण केलेली आढळते. आपल्या मालकीच्या आवारात आणि शिवारात हा शंभुमहादेव धुंदपणे अव्याहत संचार करीत असतो. अशाच एका प्रसन्नतेच्या उत्कट अवसरी तो यशोदेच्या पुढ्यात आपली पिवळीजर्द फडा काढून तटातून उभा राहतो...मातेची आणि अपत्याची कोणी तरी एका अज्ञात पटवेकऱ्याने घडवून आणलेली ही भेट. दोघेही एकमेकांना ओळखतात. अंधत्वाचा शाप पत्करूनही तो तिला टक्कपणे न्याहाळतो. कारण या शापाचा उश्शाप त्याला माहीत असतोच. आपल्या नवजात बाळरूपाला आणि त्याच्या जननीला प्रक्षाळलेल्या, न्हाणीघरातल्या त्या सलिल राशीत लोळण घेऊन आपल्या अंधत्वाचा शाप नाहीसा करता येतो, याची त्याला जाणीव असते. खात्री असते. प्रत्येक पिढीतील जीवधारणेचे हे आवर्तन त्याच्या पाठांतरातले असते. न्हाऊन धुवून पिवळे अंगडेटोपडे लेवून आणि सबंध अंगभर काळ्या चकत्यांची तीट लावून, दृष्टी प्राप्त झाल्याच्या आनंदभरात हे बाळ मातेच्या पुढ्यात येऊन, जमिनीतून वर उफाळून येणाऱ्या पाण्याच्या कारंज्याप्रमाणे तरारून जेव्हा उभे राहाते, त्या वेळी यशोदामातेला कोण आनंद, कोण समाधान होते. ती अतीव स्नेहलतेने आणि मोठ्या कौतुकाने या खंडेरावांना उद्देशून, पण मनातल्या मनात म्हणते, "बाबारे! जा तू आता इथून. मला समजलं तुला दृष्टी आली आहे ते." यशोदेच्या या उद्गारात नुसते अपत्यप्रेमच नसते, तर अपत्य संरक्षण आणि संगोपनाचे भावही त्यात व्यक्त होतात. कारण तिला माहीत असते की आपल्या पतीने त्याच्यावर डूक धरलेला आहे, त्याला मारण्यास तो टपलेला आहे.

कथेची बांधणी रेखीव आहे. बांधा आटुस आहे. डौल गेल्या पिढीतील नऊ वारी, टोपदरी, सोनसळी सणंगाचा आहे. अलंकारही तसेच जुन्या पिढीची आठवण करून देणारे. मोठे ठसठशीत. बारशाच्या समारंभाचे मूर्तिमंत चित्र डोळ्यापुढे उभा करणारा हा परिच्छेद पाहा :—

"घरावर आंब्याच्या डहाळ्या लागल्या. नामदेवाकडून धारवाडी खणांच्या कुंच्या आल्या. विष्णु सोनार कान टोचून आणि गुडग्यावर खोबऱ्याची वाटी मोडून गेला. लक्ष्मीने बाळाच्या गळ्यात सटवाई बांधली. पाच दिवे (पंचप्राण) उजळून आलेला मुलगा कुलकर्ण्यांच्या घरात आला म्हणून देवापाशी पाच पाकळ्यांची समई उजळली. आता फक्त न्हाण्यापूर्वी कणकीचे पाच मुटके करून तेलवात लावावयाची होती."

हीच सांकेतिक सूचकता सुरुवातीलाच एका साजिऱ्यागोजिऱ्या स्वरूपात चपखलपणे मांडलेली आढळते.—

"विहीर ओलांडून उन्हे पुढे सरकली की, विहिरीच्या काठावर कुठूनतरी कोणचेसे एक पाखरू रोज नियमितपणे येऊन बसलेले (यशोदा) पाहात असते. तिला मोठे नवल वाटत असते, हे पाखरू कुठून, कसे येत असेल? त्याचप्रमाणे पांडू गुरवाच्या बायकोने उजळलेल्या दीपवातीतील त्या निळ्या ठिपक्याकडे पाहून तिला असेच नवल वाटायचे कोणाच्यातरी येण्याची, काहीतरी घडण्याची, –देवाकडून– आपण सारीजण वाट पाहात आहोत. प्रत्येक पहिलटकरणीला, दिवस गेल्याचे ध्यानात आल्यावर, आपल्या कुशीत जन्माला येऊ घातलेल्या जीवाबद्दल अशीच ओढ आणि कुतूहल वाटत असेल का? रोज नियमितपणे येणारे ते पाखरू, डोणीच्या पाण्यातील त्या पिवळ्या चकत्या, आनंदाच्या बेहोषीत डुलणारी ती माळदांडीची हिरवीगार ताटे, आणि या सगळ्यांना बघणारी मी—तिला वाटायचे. हे सगळें ठरलेले होते. देवानेच ठरविले होते. फार फार वर्षांपूर्वी ठरल्याप्रमाणे सारे घडून येत होते. सणासुदीला आठवणीने सारे घर जमावे तशी सारीजण भेटणारच होती. इथे या जागी. का? का वाटते आपल्याला असे कधी कधी?"

या नाट्यमय जीवनाच्या रंगमंचावर गोळा होणाऱ्या या पात्रसंचामध्ये अविभाज्यतेने वावरणारी यशोदा निराळी आणि हे सारे आपण रोज पाहात आहोत असे पृथगात्मतेने सांगणारी यशोदा निराळी; आणि अतिशय ताटस्थ्याने हे कथानक रंगवणारा लेखक तर फारच दूर उभा— !

— रंगनाथ देशपांडे

# भावकवी गोविंदाग्रज

• भवानीशंकर पंडित •

भावना हा ललित वाङ्मयाचा प्राण आहे. गडकरी हे अत्यंत भावनाप्रधान होते. क्षणात ते विकाराला वश होत, तर क्षणात त्यांचे अंतःकरण भावनेने उचंबळून येत असे. ते जेवढे भावनाप्रधान तेवढेच बुद्धिमान होते. त्यामुळे त्यांनी निर्माण केलेल्या कविता, नाटक आणि विनोद या त्रिविध ललित वाङ्मयात मनोविकार, मनोभाव आणि बुद्धीचा कल्पनामय चमत्कार यांचा रसिकांच्या हृदयात अपूर्व खळबळ उत्पन्न करणारा सुंदर व सरस संगम आढळतो.

गडकऱ्यांच्या मनावर इंग्रजी साहित्यापेक्षा संस्कृत साहित्यशास्त्राचा संस्कार अधिक खोल होता. संस्कृत साहित्यशास्त्रात कवि व नाटककार या दोन भूमिका भिन्न नाहीत. त्या शास्त्रात कवीच्या काव्याला श्रव्य आणि नाटककाराच्या काव्याला अभिनेय ही विशेषणे आहेत. त्याचप्रमाणे विनोदाचा अंतर्भाव हास्य या रसात होतो. पौरस्त्यांचे हे प्राचीन साहित्यशास्त्र ललित वाङ्मयातील कोणत्याही वाङ्मयीन प्रकारात रसोत्कर्षास आणि उक्तिवैचित्र्यास विशेष मान आणि महत्त्व देते.

याउलट इंग्रजी समीक्षा शास्त्रात कवी, नाटककार व विनोदक या भूमिकांत भिन्नत्व आहे. त्या समीक्षेप्रमाणे कवितेत कवीच्या मनोलेखनास प्रामुख्य आहे. कवितेत ते शास्त्र कवीच्या आत्माविष्काराची अपेक्षा करते. ते त्या कवितेत कवीच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब पाहण्याचा प्रयत्न करते. नाटकात ते नाटककाराच्या अलिप्ततेस महत्त्व देते. नाटककाराने आपल्या आंतरिक व्यक्तिमत्त्वाला वेगळे ठेवून नाटकातील पात्रांचे संचालन केले पाहिजे अशी त्याची अपेक्षा असते; आणि विनोदात ते विनोदकाच्या वाक्चातुर्याइतकेच त्याच्या सहृदयतेस मान देते.

गडकऱ्यांच्या ठिकाणी इंग्रजी समीक्षाशास्त्रातील 'कवी' प्रबल होता. परंतु संस्कृत साहित्यशास्त्राचा त्यांच्यावर प्रभाव असल्यामुळे, तो 'कवी' कविता, नाटक व विनोद या त्यांच्या तिन्ही क्षेत्रांत सारखेच वर्चस्व गाजवीत होता. वस्तुतः गडकऱ्यांचा पिंड हा मूलतः कवीचा होता. वाग्वैजयंतीतील त्यांच्या काही कविता व्यक्तिवाचक आहेत तर काही कविता वस्तुवाचक आहेत. ' राजहंस माझा निजला ', 'कन्हय्या, बजाव बजाव मुरली ' आणि 'प्रेम आणि मरण ' यांपैकी पहिल्या दोन कविता नाट्यपर आणि तिसरी कविता आख्यानपर आहे आणि त्यांचे स्वरूप वस्तुवाचक ( objective ) आहे. परंतु या कवितांतदेखील गडकऱ्यांचे व्यक्तिमत्त्व मधून मधून डोकावताना दृष्टीस पडते. गडकऱ्यांच्या कवितेत कालिदास, भवभूती व बाण या संस्कृत कवींचे आणि शेक्सपिअर, बायरन् व शेले या इंग्रज कवींचे नामनिर्देश आहेत. तेव्हा त्यांच्या काव्यशैलीवर संस्कृत कवींचा कल्पनाविलास आणि वाग्वैभव व इंग्रज कवींची भावोत्कटता आणि परिणामकारकता यांची छाया पडावी हे स्वाभाविक आहे. गडकऱ्यांची कविता केशवसुतांच्या कवितेप्रमाणे पूर्णतया इंग्रजी वळणाची वाटत नाही, याचे हे एक कारण आहे. परंतु ती आधुनिक वाटते, याचे कारण तिचे अंतरंग इंग्रजी आहे, मात्र थाटमाट मराठी आहे. ज्यांत गडकऱ्यांच्या कल्पनाविलासाचा फुलोरा फारसा नाही, वाग्वैभवाचा दिमाख नाही, अशा काही निर्भेळ भावकविता वाग्वैजयंतीत आहेत. त्यांत गडकऱ्यांच्या व्यक्तिगत जीवनाचे सादपडसाद उमटले आहेत, मनाची पडछाया पडली आहे. त्यांचे विवेचन या लेखात प्रस्तुत आहे.

संस्कृत नाटकात व इंग्रजी नाटकात एक महत्त्वाचा भेद असा आहे की, संस्कृत नाटकात सारा भर रसोत्कर्ष व वाग्विशेष यांवर असतो, तर इंग्रजी नाटकात तो भर, संविधानक व व्यक्तिदर्शन यांवर असतो. गडकऱ्यांच्या नाटकांचा भर करुण व हास्य या रसांवर आणि अर्थालंकार व शब्दालंकार यांवर विशेष आहे. व्यक्तिदर्शनाच्या दृष्टीने धुंडिराजाचे पात्र अविस्मरणीय आहे. परंतु ते भावबंधनातले प्रमुख पात्र नाही. गडकऱ्यांनी आपल्या वाङ्मयीन जीवनास अगोदर कवितालेखनाने प्रारंभ केला. नंतर नाटक मंडळीतील मुलांचे मास्तर म्हणून किर्लोस्कर नाटक मंडळीत त्यांचा प्रवेश झाला. तेथे रंगभूमीवरील प्रयोगांचे निरीक्षण

आणि 'रंगभूमी' मासिकाचे संपादक या नात्याने नाटकांचे परीक्षण केले. पुढे रात्रंदिवस नाटकांचा हव्यास, निदिध्यास व अभ्यास यांच्या बळावर ते यशस्वी नाटककार बनले. कविता ही सहजस्फूर्त असते. तिच्यात भाव हाच प्राण व प्रमाण असतो. तिचा उद्रेक हा पुराप्रमाणे अनावर आणि धबधब्याप्रमाणे प्रचंड असतो. या उलट नाटक हे पूर्वनियोजित असते. त्यांत प्रसंगानुरोधाने आणि पायरीपायरीने व्यक्तीचे दर्शन व रसाचे उद्भावन साधावे लागते. कविता ही रानावनातून धावणाऱ्या स्वच्छंद निर्झराप्रमाणे असते. तिच्याकडे मुद्दाम धाव घेणारे निदर्शक वेचक व मोजकेच. परंतु नाटक हे शरत्कालातील नदीप्रमाणे संथ व शांत असते. ती नगराजवळून निरनिराळ्या आकाराप्रकारांनी युक्त असलेल्या देवळालगतच्या घाटांमधून वाट चालत असते. तिच्या घाटावर बसावे, तिच्या काठांवर विसावावे, तिच्या पाटावर पोहत असणाऱ्यांना पाहून हसावे, या इच्छेने तिच्या दर्शनास सहेतुक जाणारे पुष्कळजण असतात. गडकऱ्यांची नाटके संथ नाहीत. त्यांत जागजागी पूर व धबधबे आहेत. कथा, कादंबरी आणि नाटक यांसारख्या वस्तुवाचक वाङ्मयप्रकारात स्वच्छंद काव्याचा सन्निवेश होण्याचे वस्तुतः काही कारण नाही. परंतु गडकऱ्यांच्या नाटकात कितीतरी ठिकाणी काव्याचे स्वच्छंद उन्मेष व उद्रेक दृष्टीस पडतात.

आपल्या नाटकांतील पात्रांपासून गडकरी स्वतःला अलिप्त ठेवीत नाहीत. प्रेमसंन्यासातील जयंताच्या मुखाने ते काव्य तर बोलतातच; पण आपले हृद्गतही व्यक्त करतात. पुण्यप्रभावातला वृंदावनही कवी वाटतो. मधून मधून तो गडकऱ्यांचे दुःख सांगतो. " एकच प्याल्यातील रामलाल व तळीराम ही दोन पात्रे म्हणजे आपल्या व्यक्तिमत्त्वाचे उदात्त आणि मलिन असे परस्पर विरोधी दोन पैलू होत असेच जणू काही त्यांना सुचवावयाचे होते. " असे त्यांचे शिष्य आचार्य अत्रे म्हणतात. [ 'अप्रकाशित गडकरी' पृष्ठ बारा.] भावबंधनातील घनश्याम अपमानित झाल्यामुळे, " काय संबंध दयामायेचा? कोणी कधी माझ्यावर दयामाया केली आहे? दयामाया हे सारे शब्द रिकामटेकड्या भाषापंडितांनी कोशाच्या खोगिरभरतीसाठी तयार केले आहेत." असे संतापाचे उद्गार काढतो. तोच पुढे, " ही खरी दया, ही निरपेक्ष दया! प्राणिमात्र गोगलगाय बनतो तो याच दयेमुळे!" असे कृतज्ञतेचे प्रेमळ उद्गार काढतो. त्यांत लहरी व विक्षिप्त वाटणाऱ्या, पण कृतज्ञ व प्रेमळ असणाऱ्या, गडकऱ्यांचे विलोल व विलोभनीय दर्शन आहे. प्रेमसंन्यासाच्या परीक्षणात गडकऱ्यांचे गुरु सुप्रसिद्ध संस्कृततज्ज्ञ व भाषाशास्त्रज्ञ पांडुरंग दामोदर गुण्ये यांनी लिहिले आहेः–" प्रेमसंन्यासात बऱ्याच स्थळी पहिल्या प्रतीचे गद्यकाव्य आढळते. याचे कर्ते व 'निजलेल्या राजहंसा'चे कर्ते ही एकच व्यक्ती आहे हे समजले म्हणजे वरील गोष्टीविषयी आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. हे काव्य बहुतेक लीलेच्या व काही जयंतच्या तोंडी आले आहे. दोघेही प्रेमळ व काव्यमय असल्यामुळे 'जेव्हा जेव्हा गाठ पडते तेव्हा तेव्हा उत्तम काव्याची निष्पत्ती होते." [मा. मनोरंजन. जाने. १९१५ ].

गडकऱ्यांच्या प्रतिभेत कवित्वाचा अंश अधिक असल्यामुळे त्यांच्या नाटकात मधूनमधून कविता आहेत. 'भीमकबाळा', 'आठवतो का सांग, सखे! तो?', 'निज बाळारे!', 'नीज गुणी बाळ झणी' इत्यादी नाटकी पदे म्हणजे त्यांच्या स्वतंत्र कविता आहेत. त्या कवितांचा त्यांनी नाटकात अंतर्भाव केला आहे. 'प्रेमसंन्यास' व 'वेड्यांचा बाजार' ही नाटके गद्य आहेत. परंतु त्यांत कविता आहेत. इतकेच नव्हे, तर प्रेमसंन्यासात केशवसुत, बालकवी व तांबे यांच्या मराठी कवितांचा आणि नज़ीरच्या उर्दू कवितेचा समावेश करण्यात आला आहे.

नाटकातील संवाद त्रुटित व सुटसुटीत असतात. गडकऱ्यांच्या नाटकातले संवाद प्रदीर्घ व लांबलचक आहेत. त्यांच्या नाटकातील 'स्वगते' दोन दोन तीन तीन पृष्ठे लांबली आहेत; त्यात त्यांचा आत्माविष्कार आहे. गडकऱ्यांच्या प्रज्ञेत कवित्वाचे प्रमाण विशेष असल्यामुळे त्यांना नाटककाराचे 'नाटक' किंवा सोंगढोंग साधत नाही. नाटकाच्या ओघात ते आपली नाटककाराची भूमिका विसरतात आणि प्रांजल व प्रामाणिक आत्मनिवेदन करू लागतात.

गडकऱ्यांच्या नाटकातील भाषा ही भावनेप्रमाणे बदलते; परंतु पात्रांप्रमाणे बदलत नाही. वस्तुतः नाटकात भाषा ही त्या त्या पात्राच्या स्वभावाप्रमाणे व मनातील भावांप्रमाणे बदलली पाहिजे. आणखी एक प्रकार असा की, गडकरी हे शब्दामागे फार असतात. नाटकात शब्दापेक्षा मूक अभिनयाचे माहात्म्य विशेष आहे. नाटक हे अभिनेय काव्य आहे. उलट काव्य हे श्रव्य आहे. तेव्हा काव्यात शब्दाला विशेष स्थान आहे. यावरूनसुद्धा गडकऱ्यांत 'नाटककारा' पेक्षा 'कवी' किती प्रबळ होता ते सहज लक्षात येईल.

गडकऱ्यांच्या एकंदर वाङ्मयाचा विचार केला, तर त्यात, करुणरसाचे नैसर्गिक व हृदयद्रावक उद्भावन प्रत्ययास येते. त्यांच्या अनेक कवितांवर व नाटकांतील पुष्कळ प्रसंगांवर एक प्रकारच्या उदासीनतेची सावली आहे. ती व्यथादायक असली, तरी रमणीय आहे, हा तिचा विशेष आहे. गडकऱ्यांचा बहुतेक विनोद शब्दनिष्ठ आहे. तो सुभाषिताच्या स्वरूपाचा (wit) आहे. त्यांच्या वाङ्मयात प्रसंगनिष्ठ व स्वभावनिष्ठ असा विनोद (humour) फार कमी आहे. विनोद निर्माण करताना ते पुष्कळदा अतिशयोक्तीचा अवलंब करतात. त्यांचा विनोद अनेक वेळा कल्पनेवर आधारलेला असतो. त्यात हृदयाच्या मार्दवापेक्षा बुद्धीची तीव्रता अधिक आढळते; त्यामुळे तो विदग्ध रसिकांच्या लक्षात येतो; परंतु साधारण सुशिक्षितांच्या लक्षात एकदम येत नाही. याच कारणामुळे गडकऱ्यांच्या वाग्वैजयंतीचा व नाटकाचा जितका बोलबोला झाला, तितका 'रिकामपणाच्या कामगिरी'चा जल्लोष झाला नाही.

गडकरी यांच्या त्रिविध भूमिकांत 'कवी' ही भूमिका कशी मूर्धन्य होती यासंबंधी आता विशेष विवेचनाची आवश्यकता नाही. गडकऱ्यांच्या कवितांचा स्वतंत्र विचार केल्यास, ज्या कवितांत त्यांच्यातील निर्भेळ 'कवी'चे दर्शन होते, अशा कवितांचा आजपर्यंत फारसा विचार झालेला नाही. ज्या कवितांत शब्दांचा विशेष बडिवार नाही, ज्यांत कल्पनांचा फापटपसारा नाही, ज्यांत केवळ निखळ भाव आहे, अशा अनेक कविता वाग्वैजयंतीत आहेत. त्यांत गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब उमटले आहे. त्यांचा विचार गडकऱ्यांच्या चरित्राच्या अनुषंगाने झाला पाहिजे.

अशा कवितांपैकी एक गट, आयुष्याच्या आरंभी गडकऱ्यांना जगातील व्यवहाराचा जो कडू अनुभव आला, त्यासंबंधी काढलेल्या, औपरोधिक उद्गारांचा आहे. त्यांत गडकऱ्यांच्या मनातील व्यथा, विपण्णता आणि विषाद यांचे प्रकटीकरण झाले आहे. गडकऱ्यांचे सुसंगत आणि विश्वसनीय असे चरित्र अद्यापि लिहिण्यात आलेले नाही. आचार्य अत्रे सांगतात;—" गडकरी हे बहुधा १९०५ साली म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा पास झाले असावेत. त्यानंतर तीन वर्षे त्यांनी 'किर्लोस्कर मंडळी'त मुलांना शिकविण्याचे काम केले. तेथे काही मतभेद होऊन १९०९ च्या नोव्हेंबरमध्ये त्यांनी वऱ्हाडातल्या बाळापूरच्या शाळेत अवघे पंधरा दिवस मास्तरकी केली." ['अप्रकाशित गडकरी' पृ. नऊ.] "किर्लोस्कर कंपनी जरी गडकऱ्यांनी सोडली होती, तरी त्यांचे मन कंपनीच्या वातावरणात घुटमळत होते. त्या वेळचे एक सुप्रसिद्ध लेखक अप्पाजी विष्णु कुलकर्णी हे किर्लोस्कर कंपनीसाठी एक नाटक लिहीत होते. खेरीज श्रीमती हिराबाई पेडणेकर ह्यांचे 'दामिनी' नाटक बसविण्याचा कंपनी विचार करीत होती. स्वतः गडकरीही त्याच वेळी प्रल्हाद चरित्रावर 'गर्वनिर्वाण' हे नाटक लिहीत होते." ['अप्रकाशित गडकरी' पृ. अडतीस व एकोणचाळीस] वाग्वैजयंतीतील कविता कालानुक्रमाने दिलेल्या नाहीत किंवा प्रत्येक कवितेखाली स्थलकाल निर्देश नाही. तरी पण 'घरात बसलेल्या काजव्यास,' 'कोणी कोणास तरी', 'स्मशानातले गाणे', 'मोरपिसावरचा डोळा', 'लांडोर', 'नटमित्रास पत्र' आणि 'अल्लड प्रेमास' अशा काही कविता १९०५ ते १९१० या पाच वर्षांच्या काळातील असाव्या असे वाटते. यांपैकी बहुतेक कवितांत तीव्र उपरोध व सूक्ष्म उपहास आहे. हा बहुधा 'काळ' पत्राचा प्रभाव असावा. त्या काळी शिवरामपंत परांजप्यांचे 'काळ' पत्र तरुण वाचकांत अतिशय प्रिय होते. गडकऱ्यांच्या 'काळ', 'बिपिनचंद्र पाल यांची सुटका', 'पानीपतचा फटका' इत्यादी कविता परांजप्यांनी 'काळा'त प्रसिद्ध केल्या होत्या. परांजप्यांच्या काव्यपूर्ण औपरोधिक शैलीचा तरुण गडकऱ्यांवर बराच परिणाम झाला होता. यांपैकी 'कोणी कोणास तरी' ही चुटकेवजा कविता किर्लोस्कर कंपनीतील कोणातरी रूपसंपन्न स्त्रीपार्टी नटाला उद्देशून असावी. 'मोरपिसावरचा डोळा' आणि 'लांडोर' या दोन्ही कविता दिसावयास विलग दिसल्या तरी सलग आहेत.—

" क्षणमात्राची मोहकता ही । चंचलतेने चमकत राही<br>प्रेमाचे मुळि पाणी नाही । कसला डोळा ? । हे रंग<br>जाहले गोळा ।

कितीक असले फसवे डोळे । रंगीबेरंगी जणु गोळे<br>जगात पाहुनि फसती भोळे । दे हो जोड । देवा ! ते<br>डोळे फोड ! "

'भपकेबाज हृदयशून्यते'वरील ही प्रखर टीका एखाद्या विवक्षित व्यक्तीला तर अनुलक्षून नसावी ना ? 'लांडोरी' मधील व्यक्ती कुणीतरी विवक्षित स्त्री असावी असे वाटते. आचार्य अत्रे सांगतात;—" हिराबाई पेडणेकर गोमांत-

कीय असून सुस्वरूप आणि उत्तम गाणाऱ्या होत्या. त्यांचे शिक्षण जरी फारसे झाले नसले तरी त्या सुसंस्कृत होत्या. त्या वेळचे सुप्रसिद्ध नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, नरसिंह चिंतामण केळकर आणि राम गणेश गडकरी ह्यांचे त्यांच्याकडे पुष्कळ जाणे येणे असे. " [ 'अप्रकाशित गडकरी ' पृ. बत्तीस ] श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या आत्मवृत्तात हिराबाईसंबंधी जागोजाग निर्देश आलेले आहेत. त्या निर्देशातील माहिती एकत्र करून आणि तिच्यात अन्य माहितीची भर घालून नागपूरच्या ' तरुण भारतां ' ने आपल्या रविवार दि. ७ ऑक्टोबर १९६२ च्या अंकात एक सविस्तर लेख दिला आहे. एकाच वेळी किर्लोस्कर कंपनीसमोर पेंडणेकर आणि गडकरी यांची नाटके होती. दोघांचीही नाटके त्या वेळी कंपनीच्या रंगभूमीवर आली नाहीत. परंतु दोघेही कोल्हटकरांच्या शिष्यशाखेत होती आणि नाटकाच्या क्षेत्रात उमेदवार होती. या दृष्टीने या ओळी विचारणीय आहेत;—

" नाचता मोर । नाचते पहा लांडोर

त्याचा आनंदाचा नाच । दिवे लाविले जाळुनि पाच
कोठे हिरा, कुठे ही काच । तरिहि समोर ॥ नाचते०

कमअस्सल या अक्करमाशा । ताज्या रक्ता जळवा वाशा
करिती जगती स्वैर तमाशा । रूप अघोर ॥ नाचते०

खोटेनाटे जगी पसरते । फारपणाने खरेहि ठरते.
खरे बिचारे दिसते भलते । मग बिनघोर ॥ नाचते०

बघुनि प्रकार उलटा असला । येत जगाचा वीट मनाला
वाटे विनवावे देवाला । नको तो मोर । आणि ही नको
लांडोर ॥ "

परंतु या सर्व कवितांत भावनेच्या दृष्टीने, 'अल्लडप्रेमास' ही कविता अत्यंत उत्कट आहे. पोटापाण्याची विवंचना करणाऱ्या स्वाभिमानी व सरल हृदयाच्या गडकऱ्यांना लहान वयात व्यवहारी जगाचा जो अनुभव आला, त्याचा जहरी फडफडपणा या त्रागाच्या आणि वैतागाच्या भावगीतांत उतरला आहे. गडकऱ्यांच्या परिणतप्रज्ञ प्रतिभेचे प्रथमदर्शन या भावगीतांत होते. जानेवारी १९०९ च्या मासिक मनोरंजनात ' एडीटरचे टेबल ' या सदरात ' पसंत. सवडीने ' अशी या गीताची अगोदर पोच आली होती; आणि नंतर मे १९०९ च्या मनोरंजनात हे गीत प्रसिद्ध झाले होते.

" क्षणभर वेड्या प्रेमा ! थांब
अधिर मनासह जासी कोठे ? । चुकशिल संकटि
पडशिल वाटे ।
जग हे सारे बा रे ! खोटे । हृदया सोडुनि, गड्या
म्हणोनी जाइ न कोठे लांब !
टाकिल कुणि तुज धिक्काराने । रडविल किंवा उपहासाने
फसविल नकली की मालाने । कोणी भटकत, उगाच
रखडत, फिरविल मागोमाग !
कोणी तुजला मानिल खोटे, । तिरस्कारही दिसेल कोठे
अपमानाचे भयही मोठे । बाग जगाची, ही न फुलांची,
कांटे जागोजाग."

१९११ ते १९१५ मधील गडकऱ्यांच्या भावकवितेत वैवाहिक जीवनातील असमाधानाचे, उद्विग्नतेचे व निराशेचे उद्गार आहेत. या भावकवितांत त्यांनी स्वतःला वारंवार 'जीवन्मृत' किंवा ' चिरनिराश ' म्हटले असून प्राक्तनाला दोष दिला आहे. 'अंधाला दृष्टिलाभ', ' अवेळी ओरडणाऱ्या कोकिळेस ', ' ती कोण ? ', ' पुनर्विकसन ', ' गीत विरक्ति ', ' फुले वेचली पण ', ' वेडा, ' ' ओसाड आडातील एकच फूल ' यांसारख्या कवितांत त्यांचे विदीर्ण अंतःकरण प्रकट झाले आहे. गडकऱ्यांच्या वैवाहिक जीवनाविषयी त्यांचे परम मित्र विठ्ठल सीताराम गुर्जर लिहितातः- "हिंदू कुटुंबातील मामुली वहिवाटीला अनुसरून गडकऱ्यांचे पहिले लग्न १९०५ पूर्वीच झाले होते. याच वेळी गडकऱ्यांच्या आयुष्याशी निगडित अशी काही अत्यंत खासगी स्वरूपाची गोष्ट घडून आली. तिने त्यांचे साऱ्या संसारावरचे मन उडाले. " [ मनो. फेब्रु. १९१९ ] आचार्य अत्रे सांगतात, " गडकऱ्यांनी आपली पहिली पत्नी टाकून दिली होती. कोणी म्हणत, ती त्यांना सोडून गेली होती. त्यानंतर मरणापूर्वी एक वर्ष आधी त्यांनी एका तरुण मुलीशी लग्न केले होते. हा विवाह दोघांपैकी कोणालाच सुखकारक झाला नाही. " [ ' अप्रकाशित गडकरी ' पृ. पंचवीस सव्वीस ] गडकऱ्यांच्या ज्या भावकवितांचा येथे निर्देश केला आहे, त्या त्यांच्या प्रथम विवाहाला उद्देशून आहेत. ' अवेळी ओरडणाऱ्या कोकिळेस 'मध्ये ते उद्गारतातः—

" निष्प्रेमाची शेज सोबती, । भयाण दुनिया सारी भवती ।
हाती संसाराची माती । "

' ती कोण ? ' मध्ये ते कळवळून विचारतात;—

ओठांशी भिडते रहस्य मनिचे सांगू कुणाला परी ?
आला दाटुनि कंठ–हाय ! रडुनी कोठे करू मोकळा ?

आणि ' फुले वेचली पण– ' मध्ये सांगून टाकतात की,

" चिरंमृताला हवा कशाला हा असला हव्यास ?
जिवंत फुलवंतीचा असला दुःखप्रद सहवास ? "

१९१५ आणि १९१६ या वर्षांत गडकऱ्यांच्या ' प्रणया 'ची ' वेचणी ' झाली असावी असे ' दुदर्शन ', ' निर्वाणीची विनवणी ', ' एका शब्दासाठी विनंती ', ' निर्दयवालेस ', ' गोफ ', ' हृदयास ' आणि ' शेवटचे प्रेमगीत ' या भावकवितांवरून वाटते. यांपैकी ' गोफ ' व ' शेवटचे प्रेमगीत ' या कवितांखाली स्थलकालनिर्देश नाहीत. ' गोफ ' ही कविता ' उद्यान ' मासिकात आली होती. ' दुदर्शन ' या चार चरणांच्या कवितेखाली ' पुणे २-१२-१५ ' असा स्थलकालनिर्देश असून तिच्यात, ' कोणत्याही दुर्दैवघटिताने चित्त जितके खिन्न होत नसेल, तितके ते

विश्रब्ध **प्रणयास** वंचित यदा **सौंदर्य** स्वार्थास्तव—

मुळे होते, असा एक दुःखदायक स्वानुभव निर्दिष्ट केला आहे. उरलेल्या चार कविता मुंबईच्या मुक्कामात स्फुरलेल्या असून त्या १९१६ साली, मार्च ते जूनच्या मधल्या काळात, लिहिल्या आहेत 'अप्रकाशित गडकरी' मध्ये गडकऱ्यांच्या ' रोजनिशी'तील मुंबई मुक्कामातील शनिवार १३ मे १९१६ पासून ते गुरुवार २१ सप्टेंबर १९१६ पर्यंतची 'पाने' आहेत. या 'पानां'त रविवार १४ मे १९१६ व सोमवार २२ मे १९१६ ला हिराबाईकडून चाली आणल्याचा उल्लेख असून, शनिवार २२ जुलै १९१६ ला अण्णा म्हणजे गुर्जर, हि·शी म्हणजे हिराबाईशी तंटा करून मोकळे झाल्याचा उल्लेख आहे. वरील भावकविता याच कालखंडातील आहेत. त्यांच्यातील उत्कटता हृदयस्पर्शी आहे. त्या कुणास तरी उद्देशून असाव्या. त्या कुणास उद्देशून आहेत, त्या व्यक्तीचे आणि कवीचे साक्षात संबंध कोणत्या प्रकारचे होते, किंवा डॉण्टेच्या ' डिव्हाईन कॉमेडी 'तील व्यक्तीप्रमाणेच ती व्यक्ती कवीच्या केवळ कल्पनामय स्वप्नात होती, इत्यादी बाबींची चर्चा किंवा संशोधन अप्रस्तुत आहे. मात्र या भावकविता जितक्या उत्कट तितक्या उज्ज्वल असून सहजगत्या हृदयंगम आहेत, यात काही संशय नाही. यांपैकी ' निर्दयवाले 'समध्ये

" केल्या ज्याच्या पायघड्या मी तुझ्या पावलांसाठी
त्या हृदयाला तुडवून गेलिस नटव्या थाटापाठी "

असा ' नटवेपणा 'चा धिक्कार आहे, तोच ' हृदयास ' या कवितेत

" नटव्या सोंगामागे लागे जे त्या सौंदर्यासाठी
नवलाखाचे मोल देसि का कशास या आटाआटी ! "

असा दुप्पट जोराने स्फोट पावला आहे. मागे 'भांडार' या कवितेत ' कमअस्सल, असा ' अक्करमासेपणा ' चा तिरस्कारयुक्त उल्लेख आहे. तसाच उल्लेख ' हृदयास'मध्ये आहे

" जिथे गुणाची चाड न काही कमअस्सल जे जातीचे
सौंदर्यचि ते कसले ? केवळ एक बाहुले मातीचे "

पुढे या कवितेत गडकरी स्वतःच्या ' हृदयास ' संबोधून उपदेश करतात. या उपदेशात ते 'वेड्या प्रेमा !', ' चुकल्या तरुणा ! ', ' जिवलग हृदया ! ' ही संबोधने योजतात.

" तुझ्या जिवाच्या बोलासाठी हपापले हे रसिक पहा
स्वागत करि जा त्यांचे त्यांना हर्ष किती होईल अहा !
विद्यावैभव तुझे कुठे, तो ज्ञानाचा गौरव कोठे,
उदारता तव विशाल पाहुनि देवालाही मोह सुटे,
गर्वाचे घर खाली पडुनी खुशाल मिळु दे मातीत
रसिकांच्या मृदु हृदयमंदिरी रहा, निजयशा मिरवीत."

भाव हा गेय असेल, तर तो विशेष हृदयंगम होतो. गडकऱ्यांच्या ह्या साऱ्याच भावकविता गेय एवं हृदयंगम आहेत. मात्र गडकरी कुणाच्या नटवेपणाचा व कमअस्सलपणाचा तिरस्कार करीत आहेत त्याचा उकल होत नाही. अर्थात त्यामुळे कवितांच्या आस्वादनात काही कमतरता राहते असे मुळीच नाही.

गडकऱ्यांच्या अखेरच्या भावकविता काहीशा अनुतापातून उद्रेक पावल्या आहेत. ' अप्रकाशित गडकरी ' मधील ' रोजनिशीतील पानात शुक्रवार २ जून १९१६ ची नोंद आहे; " प्रेमसन्यासचा प्रयोग एका कोणत्याशा फंडासाठी झाला. त्यात लाजेने ओशाळण्याइतका फारच मुंबईच्या प्रेक्षकांनी सन्मान केला " ही नोंद गडकऱ्यांच्या नम्रत्वाची द्योतक आहे ' परमाणूंचे कार्यमाहात्म्य ' या भावकवितेत त्यांनी

" निजकवनाचे मसिलेखन हे, पुसुनि न जावो क्षुद्र तरी
गोविंदाग्रज यास्तव त्यावर वाळूचे कण हे पसरी."

असे विनयोद्गार काढले आहेत. ‘फुल ना फुलाची पाकळी’ त त्यांनी ताजमहाल, शाकुंतल, रामायण आणि गीता यांचा हवाला दिला असून, शहाजानाची चैन, कालिदासाची विलासप्रियता, वाल्मीकीचा वाटमारेपणा आणि कृष्णाच्या गोकुळातल्या लीला यांचा लोकांना विसर पडला आहे असा आत्मप्रत्यय सांगितला असून, आपले समर्थन विनम्रतापूर्वक केले आहे:––

“दूषण वगळुनि भूषणमात्रे प्रभुपूजन करि काळ असे
तुम्ही आम्ही कष्टी होणे हा कुठला मग न्याय असे?”

वयाला चौतीस वर्षे पूर्ण झाली नाहीत तोच ऐन तारुण्यात गडकऱ्यांना मृत्यू आला. त्यांनी,

“म्हणे, राम, जे जे मनी, मुखी आलें। ते ते येथ
झाले ब्रह्मार्पण.”

असे वाग्वैजयंतीच्या अंती आत्मसमाधानाचे उद्गार काढलेले असले, तरी त्यांच्या आकांक्षांची, इच्छांची आणि ध्येयांची अजून तृप्ती झाली नव्हती. ते अतृप्त, अस्वस्थ व साशंक होते. An April Fool's Work म्हणून त्यांनी मृत्यूपूर्वी आठ महिने व तीन आठवडे आपला ‘मृत्युलेख’ लिहून ठेवला होता —

‘यावज्जीवहि “काय मी” न कळले आप्तांप्रती नीटसे
मित्रांतेहि कळे न गूढ–न कळे माझे मलाही तसे
अज्ञाता! मरणोत्तर प्रकट ते होईल तूते कसे?
कोठे आणि कधीतरी जगति मी होऊन गेलो असे.”

गडकरी जाऊन आज शेहेचाळीस वर्षे झाली. ते आमच्या या महाराष्ट्रात होऊन गेले. गडकरी ही व्यक्ती आज आमच्यात नाही. परंतु गडकरी ही वाङ्मयीन विभूती मात्र आमच्या स्मृतीत अजरामर आहे.

---

[रविवार दि. २३ जानेवारी १९६५ रोजी गडकऱ्यांच्या स्मृतिदिनानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, येथे दिलेले व्याख्यान.]

# शुद्ध कलाप्रेरणेचे रूप*

• स. शि. भावे •

आपण सर्वजण वाचलेले, विचार केलेले, जाणकार आणि चिकित्सक आहात. म्हणून मुद्यांची सूत्ररूपाने मांडणी केली आहे. उदाहरणे कमी घेतली आहेत. साहित्य व इतर कला यांची ‘ कला ’ म्हणून एकात्मता गृहीत धरली आहे. याने टिपण सुटसुटीत होईल, चर्चेला अधिक वेळ व अधिक अवसर मिळेल.

निरनिराळ्या कलाकृतींचा स्वतःच्या मनाला जो अनुभव मिळाला, मिळतो, त्या अनुभवाचे रूप न्याहाळावे, जाणावे, ही या विचाराची प्रमुख प्रेरणा आहे. इतरांकडून कलाकृतींचा जो विचार होतो, त्या विचाराचा आणि स्वतःच्या विचाराचा कितपत मेळ बसतो, हे ( चर्चेत ) पाहावे ही दुय्यम प्रेरणा आहे. आणखी एक आनुषंगिक प्रेरणा आहे, ती अशी : कला, कलेचा आस्वाद यांच्यासंबंधात ज्या विविध भूमिका अनिर्णीत द्वंद्वांच्या रूपाने एकमेकींसमोर उभ्या आहेत अशा भूमिकांविषयी, स्वतःच्या अनुभवाच्या निरीक्षणातून सुसंगत असा विचार करता येईल का हे पाहावयाचे आहे. ( कला आणि जीवन, व्यक्ती आणि समाज, स्वातंत्र्य आणि नियमन, दुर्बोधता आणि सुबोधता, आत्माविष्कार आणि निवेदन या अशा काही द्वंद्वात्मक भूमिका आहेत.)

माणसाच्या जगण्याच्या दोन प्रेरणा असतात. एक अपरिहार्य ( म्हणजे, माणसावर लादली गेलेली ); दुसरी ऐच्छिक.

जीविका व भोग ( आवश्यकतेपलीकडील चैन ) हे पहिल्या प्रेरणेचे पोटभेद होत.

जीविकेसाठी श्रम करताना माणसाची दृष्टी असते ती उपयुक्ततेकडे अथवा सोयीकडे. सोय हीच सर्वांत मोठी गरज होते. या गरजेप्रमाणे माणूस जगण्याचा तपशील ठरवीत जातो. या तपशीलाने त्याच्या जगण्याची दिशा आपोआप निश्चित होते.

जशी जीविका, तसाच भोग ही एक जन्मसिद्ध गरज आहे. उचित जीविकेने बलवान झालेल्या इंद्रियांची तृप्ती हे भोगाचे रूप खरे, पण अशी तृप्ती ही त्या त्या इंद्रियाची गरज असते. शिवाय भोगाची ही गरज जीविकेशी अविरोधी पद्धतीने पुरी करावयाची असल्याने सोय हे तत्त्व येथेही येतेच. म्हणजेच, गरज व सोय यांच्या तडजोडीशिवाय भोगाचा मार्गही खुला होत नाही.

जीविका आणि भोग यांतील तृप्ती किंवा अतृप्ती यामुळे सुख-रूप किंवा दुःख-रूप अशा भावना माणसाच्या अनुभवाला येतात. अपरिहार्य प्रेरणेतून जन्मलेल्या सर्व भावना यातनामय असतात. दुःख-रूप भावना यातनामय असतात हे सहजच पटेल. परंतु, गरजेची तृप्ती करणारे कोणतेही सुख हे यातनामयच असते, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. अपरिहार्य गरजेची अपरिहार्य तृप्ती ही गुलामगिरीच होय. काही क्षणी सुखमय, तर इतर क्षणी दुःखमय, अशी ही गुलामगिरी एकूण यातनामय आहे. या यातनामय तृप्तीमध्ये उत्तेजित अवस्था असते, परंतु शांतता नसते. ही तप्त, अतितप्त अवस्था संपणार आहे, ही भीती अशा तृप्तीत सतत दडून असते. ही भीती मरणाची, नश्वरतेची असते.

जन्म आणि मृत्यू, दोन्ही अपरिहार्य होत. जसा मृत्यू तसा जन्म आपल्यावर लादलेला असतो. कोठे, केव्हा, कसे जन्मावे हे आपल्या हातात नसते. आपल्याला हवे की नको याचा विचार न करता शरीरी जीवन आपल्यावर लादले जाते. शरीराचा जन्म, मृत्यू आणि शरीराचे अस्तित्व यांच्या अपरिहार्य नश्वरतेची ही जाणीव आपल्या एकूण जगण्यात नकळत–कळत मिसळून गेलेली असते. जीविका आणि भोग या दुपाखी जगण्यावर कायमची पडलेली मरणाची ही छाया कधीच दूर होत नाही. म्हणूनच दुःख रूप असो किंवा सुख-रूप असो, जगण्याच्या अपरिहार्य प्रेरणेचा आविष्कार यातनामयच असतो. शांततेचे, निवान्तपणाचे, म्हणजेच उपशमनाचे समाधान त्यातून कदापि मिळू शकत नाही.

अपरिहार्यतेच्या या बंधनातून सुटण्यासाठी, आणि नश्वरतेची छाया ज्यावर मुळीच नाही, अथवा कमीत कमी आहे, असे उपशमनात्मक समाधान मिळविण्यासाठी

*[ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या साहित्य–चर्चा मंडळात दि. १८-३-१९६५ रोजी वाचलेले टिपण. थोड्या फेरफारांसह. ]

माणसाची सतत धडपड चालू असते. ही त्याच्या जगण्याची ऐच्छिक प्रेरणा. या प्रेरणेचे पोटभेद दोन. एक, तत्त्वचिकित्सक वृत्तीच्या चिंतनाचा, दुसरा, कलाप्रेरणेचा.

या वृत्तीची ऐच्छिकता दुहेरी आहे :

पहिले असे की, या दोनही वृत्ती जगण्याच्या अपरिहार्य प्रेरणेच्या आविष्कारात शबल व प्रछन्न रूपाने असतात. पण शुद्ध व अविकृत रूपाने या वृत्ती जगण्यात नसल्या तरी अडत नाही.

ज्या दुसऱ्या अर्थाने या वृत्तींना, आणि जगण्याच्या या प्रेरणेला, ऐच्छिक म्हणावयाचे, तो अर्थ अधिक महत्त्वाचा आहे. जीविका व भोग यांमध्ये माणूस हा अनुभवाचा विषय अथवा भक्ष्य असतो. शरीर खाते असे त्यास वाटले तरी अपरिहार्य गरजेने शरीरच खाल्ले जात असते. तत्त्वचिकित्सा व कला प्रेरणा या वृत्तींत तो निवड करणाऱ्याच्या, स्वत्वयुक्त आणि साक्षी, भूमिकेत वावरत असतो. जसजशा व जितक्या प्रमाणात या दोनही वृत्ती शुद्ध ( अ-मिश्र ) होत जातील तसतसा व तितक्या प्रमाणात माणूस पूर्णपणे ऐच्छिक प्रेरणेने वावरू शकेल. गरज, गरजेची तृप्ती, तृप्तीची उत्तेजित अवस्था आणि या सर्वांवर पडलेली नश्वरतेची छाया, हे सारे घटक, ऐच्छिक प्रेरणेने घेतलेला अनुभव जसजसा अमिश्र होतो, तसतसे कमी होतात. शुद्ध ऐच्छिक अनुभवाला यांपैकी कशाचाच स्पर्श होत नाही.

ऐच्छिकता ही केवळ नकारात्मक प्रेरणा नाही. अक्षरत्वाचा शोध ही माणसाच्या अस्तित्वामध्येच असलेली विधायक प्रेरणा आहे. या विधायकतेमुळेच जगण्याची ऐच्छिक प्रेरणा, समर्थ, रसरशीत रंगदार आणि चमकदार होते. गरजेच्या बंधनापलीकडे असल्याने आणि साक्षी भूमिकेत असल्याने स्वतंत्रता आणि निर्भयता या गुणांनी ऐच्छिक प्रेरणा समृद्ध होते. कठोर निःपक्षपाताची धार ऐच्छिक प्रेरणेला असते.

वरील निषेधात्मक अंतराने व विधायक रूपाने अपरिहार्य प्रेरणेचे जगणे व ऐच्छिक प्रेरणेचे जगणे हे जगण्याचे साधे प्रकार राहात नाहीत. जगण्याच्या या दोन वेगळ्या गुणात्मक पातळ्या ठरतात. यांमध्ये ऐच्छिक प्रेरणेचे जगणे ही गुणात्मकतेने उच्चतर पातळी ठरते.

अपरिहार्य पातळीवर जे जे म्हणून अनुभवास येत असते, त्याचा त्याचा अपरिहार्यतेखेरीज इतर सामान्य तत्त्वांनी अर्थ शोधण्याचा प्रयत्न तत्त्वचिकित्सेमध्ये होतो. अनुभवघटकांचे सामान्य तत्-त्व—म्हणजेच अनुभवघटकांची तत्-पर-ता किंवा तात्पर्य—शोधणाऱ्या या वृत्तीच्या कार्याचे फल शुद्ध-ज्ञानात्मक असते. सुखदुःखस्वरूप उत्तेजित अवस्थेचे उपशमन येथे होते. आणि तरीही, असे काही मिळावयाचे राहते—जे कलाप्रेरणेच्या कार्याने मिळते.

जीविका, भोग आणि तत्त्वज्ञान या प्रेरणा समाधान पावूनही अनुभव उरत असतो. हा उरणारा भाग म्हणजे अनुभवाचा शुद्ध आकार, अथवा त्याचे सौंदर्य, अथवा त्याचे स्व-त्व. अपरिहार्यतेच्या मर्यादेपलीकडे उरणारे, तत्त्वज्ञानाच्या चिकित्सेत न सामावणारे, असे अनुभवाचे स्व-त्व माणसाला मिळावयास हवे असते. हे स्व-त्व अनुभवाच्या रचनावैशिष्ट्यातून, आकारातून, म्हणजेच अनुभवाच्या सौंदर्यातून व्यक्त होते. माणसाला हवेसे वाटणारे पण अपरिहार्यतेच्या बंधनात त्याला हुलकावणी देणारे अक्षरत्व अनुभवाच्या सौंदर्याच्या रूपाने माणसाला भेटते. मर्त्यत्वाच्या पकडीतून क्षणमात्र मोकळे झाल्याचे समाधान शुद्ध सौंदर्यानुभवाने माणसाला मिळते.

द्रव्यरचनेच्या विविध परींनी तयार झालेल्या आकारांचा आस्वाद घेणे, उपलब्ध द्रव्याची नवीन रचना करून नवीन आकार निर्मिणे, ही कलाप्रेरणा मनुष्यमात्रात असते. काळाच्या, परिस्थितीच्या, शुद्धतेच्या अनुरोधाने कमी-अधिकपणा असेल तो वेगळा; पण आकाराने आनंद वाटणे ही प्रेरणा सार्वत्रिक आहे यात शंका नाही. जीविकेपलीकडे जाणारी, भोगापलीकडे उरणारी, तत्त्वचिकित्सेच्या सामान्य तत्त्वात न सामावणारी अशी ही ऐच्छिक प्रेरणा आहे. सत्य आणि न्याय ही मूल्ये तत्त्वचिकित्सेचे आविष्कार आहेत; तर दया, क्षमा, त्याग, समर्पण ही मूल्ये कलाप्रेरणेचे आविष्कार आहेत. जगातील धर्मसंस्थापक प्रेषितांचे प्रारंभीचे साक्षात्कारात्मक उद्गार कलाकृती झाले आहेत हा योगायोग नव्हे. त्यांची प्रेरणा ही कलाप्रेरणा आहे.

माणूस अनुभवाचा आकार शोधतो म्हणजे अनुभवांवरील अपरिहार्यतेची पुटे दूर करून त्याचे स-त्व बाहेर आणू पाहतो. तो नवे आकार निर्माण करतो म्हणजे मर्त्य स्वतःचे स्व-त्व अधिक चिरस्थायी अशा द्रव्यात बंदिस्त करून ठेवतो. तो आकाराचा आस्वाद घेतो म्हणजे स्वतःचे भंगुर स्व-त्व आणि द्रव्यबद्ध ( म्हणून शरीराच्या अपेक्षेने चिरंतन झालेले ) स्व-त्व यांची एकात्मता अनुभवतो.

येथपर्यंत कलाप्रेरणेचे रूप स्पष्ट होते ते असे : कला-प्रेरणेचा अनुभव- हा ऐच्छिक, म्हणजेच अपरिहार्य अनुभवापेक्षा गुणात्मकतेने उच्चतर अनुभव आहे. अनुभवांचे आकार शोधणे, संवेदनाग्राह्य अशा द्रव्यांमध्ये नवे आकार निर्माण करणे व असे आकार आस्वादणे हे कलाप्रेरणेचे रूप आहे. अनुभवांचे आकार म्हणजेच त्यांचे सौंदर्य, यातून अनुभवांचे स्व-त्व व्यक्त होते. कलाप्रेरणा म्हणजे अनुभवांचे हे स्व-त्व अनुभवण्याची प्रेरणा होय.

यातून काही उपसिद्धान्त निघतात ते असे :

(१) शुद्ध कलास्वाद म्हणजे उत्कट भावनांचा अनुभव नव्हे. भावना या अपरिहार्य पातळींवरील असतात. शुद्ध कला या पातळीपासून वेगळी असते. अप्रत्यक्ष उपभोग अथवा पुनःप्रत्यय हे कलास्वादाचे रूप नाही. कलाकृतीत जितक्या प्रमाणात जीविका व भोग या प्रेरणा दिसतील तितक्या प्रमाणात ती कलादृष्ट्या हिणकस होईल.

(२) अपरिहार्य पातळीवरील अथवा तत्त्वचिकित्सेतील संगतींची ( उदा० कायदा, तत्कालीन नीती, तत्कालीन सामाजिक ध्येय, तत्कालीन सामाजिक मान्य तत्त्वज्ञान, तर्क, व्याकरण इ. ) अपेक्षा कलाकृतीच्या रचनेत करता येणार नाहीत. अपरिहार्य अनुभवाच्या पातळीवर कलाकृती समजली पाहिजे असा आग्रह कलास्वाद घेऊ इच्छिणाऱ्याला धरता येणार नाही. ऐच्छिक, शुद्ध कलाप्रेरणेनेच आपण सतत अनुभव घेत आहोतना हे कलास्वाद घेणाऱ्याने सावधपणे तपासले पाहिजे. म्हणजेच जसे कलावंतांनी तसेच कलास्वादकांनीही या दिशेने आत्मपरीक्षण करणे आवश्यक आहे.

(३) कलाप्रेरणा ऐच्छिक असल्याने व अनुभवाचे स्व त्व हे तिचे ध्येय असल्याने तिचे कार्य व्यक्तिविशिष्ट असते. कला-प्रेरणा ही जसजशी अ-मिश्र होईल तसतशी ती अधिकाधिक व्यक्तिविशिष्ट होणार हे स्पष्ट आहे. म्हणून, कलाविचारात विचारांची देवाणघेवाणच फक्त शक्य आहे. येथे वस्तुनिष्ठ शास्त्रीय विचार शक्य नाही. तसा विचार इष्टही नाही. वस्तुनिष्ठतेचा व शास्त्रीयतेचा आग्रह तर, आग्रहाच्या प्रमाणात, कलाविचाराच्या शुद्धतेला प्रतिकूल ठरेल.

कलाप्रेरणेचा विचार असामान्य पातळीवर नेऊन सुरक्षित करण्याचा हा प्रयत्न नाही. शुद्ध कलानुभव मिळावयाचा तर तो जीविका, भोग व तत्त्वचिकित्सा या प्रेरणा तावत्काल स्थगित केल्या-झाल्याखेरीज मिळावयाचा नाही, हे सांगावयाचे आहेच, परंतु, शुद्ध कलानुभव हा या अर्थाने अलौकिक असला, आणि लौकिक सुख-दुःख-रूप भावना विरणे हीच त्याची पार्श्वभूमी असली तरी, शुद्ध कलानुभव हा एक वास्तव अनुभव आहे व तो, कदाचित प्रयत्नाने पण कोणासही घेता येण्यासारखा आहे, हेही तितक्याच निश्चयाने सांगावयाचे आहे.

सामाजिक दृष्टीने शुद्ध कलाप्रेरणेचे महत्त्व काय या प्रश्नास निश्चयपूर्वक उत्तर असे की, शुद्ध कलाप्रेरणेचे महत्त्व सामाजिक दृष्टीनेही आहे.

शुद्ध वृत्तीच्या दिशेने अशी ओढ समाजात असणे हे समाजव्यवहाराच्या शुद्धतेच्या दृष्टीनेही आवश्यक आहे. व्यक्तीचे काय किंवा समाजाचे काय, जे जीवन चालणार ते अपरिहार्य पातळीवरच प्रामुख्याने चालणार हे स्पष्ट आहे. पण व्यक्तीची किंवा समाजाची ओढ कोठे आहे हे महत्त्वाचे आहे. ही ओढ जर क्रमाक्रमाने ऐच्छिक, शुद्ध पातळीकडे जाणारी असेल तर समाजाच्या प्रकृतीविषयी निर्धास्त असावयास हरकत नाही. उलट असेल तर ती काळजी करण्यासारखी गोष्ट होईल. कारण, मुळात अपरिहार्य पातळीवर जगणाऱ्या समाजाची दिशाही जर शवलतेकडे असेल तर त्या समाजाचे अपरिहार्य पातळीवर जगण्याचे सामर्थ्यही कमी होते. शुद्ध वृत्तीच्या अस्तित्वाचे त्यांच्याकडील ओढीचे जे महत्त्व आहे, ते मोजके चिकित्सक अथवा त्यांहूनही कमी रसिक यांच्यापुरतेच नाही. एकूण समाजाच्या निकोपपणासाठीही त्यांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. कारण ऐच्छिक व शुद्ध वृत्तींचे अस्तित्व हेच व्यक्तीप्रमाणे समाजाचेही खरे सामर्थ्य असते.

राहिलेला उपसिद्धान्त यातून प्रकट होतो, तो असा : अपरिहार्य पातळीवर जगणाऱ्या समाजाने, म्हणजे आपण सर्वांनी मिळून, कलाप्रेरणेला जास्तीत जास्त स्वातंत्र्य आणि संरक्षण दिले पाहिजे.

---

# स्वर्गीय राष्ट्रकवी मैथिलीशरण गुप्त

● प्रभुदास भुपटकर ●

१२ डिसेंबर १९६४ ला साऱ्या भारतीय साहित्य-विश्वाला धक्का देणारी एक दुःखद घटना घडून आली. ती म्हणजे हिंदीतील सुप्रसिद्ध राष्ट्रकवी मैथिलीशरण गुप्त यांचे निधन ही होय. वयाच्या पूर्णावस्थेमध्ये म्हणजे ७५ व्या वर्षी मैथिलीशरण गुप्त मृत्यु पावले. मरण्याचे त्यांचे वयच झाले होते, हे जरी खरे असले, तरीही त्यांचा मृत्यु ही घटना दुःखदच आहे; आणि त्यामुळेच सारे भारतीय साहित्य-विश्व शोकसागरात बुडून गेले. विचारप्रधान भूमिका घेऊन मनाचे कितीही सांत्वन करण्याचा प्रयत्न केला, तरी मैथिलीशरण गुप्त यांच्या मृत्यूमुळे वाटणारी हळहळ दूरही होत नाही किंवा कमीही होत नाही. असे का? उत्तर सोपे आहे. त्यांच्या मृत्यूने केवळ एक मानवदेह मृत्युमुखी पडला एवढेच झाले नसून, त्या मानवी देहाबरोबर एक अद्‌भुत, अपूर्व, दिव्य कविप्रतिभा लयास गेली, हे या हळहळीचे खरे कारण आहे. कांही व्यक्तित्वे कितीही वृद्ध झाली, तरी त्यांना आपण अंतरू नये अशी भावना अनेकांच्या मनात असते. मैथिलीशरण गुप्तांचे व्यक्तित्व हे त्यांपैकीच एक होते.

१९१० सालापासून मैथिलीशरण गुप्त ह्यांचे कवि-कर्म सुरू झाले; आणि १९१० पासून १९६१ पर्यंत सतत काव्य लिहीत राहून त्यांनी भारतीय साहित्य-विश्वाला विस्मित करून टाकलेले आहे. त्यांच्या काव्यकृती केवळ संख्येनेच विपुल आहेत असें नव्हे, तर काव्यरचनेच्या आरंभापासून आजतागायत त्यांच्या काव्यकृतीमध्ये गुणवत्ता सतत विकासशील राहिलेली आहे. इतर काही कवींच्या बाबतीत अशी प्रक्रिया दिसून येते की, प्रतिभा एका विशिष्ट मर्यादेपर्यंत पोहोचली की, पुढे मग तो कवि रचना करीतच असतो; पण त्या रचनांचे स्वरूप आधीच्या रचनांची री ओढणे एवढेच उरते. सुदैवाने मैथिलीशरण गुप्त ह्यांच्या बाबतीत तसे घडलेले नाही. उलट त्यांची प्रत्येक नवी रचना नवनवोन्मेषशालिनी आहे. 'क्षणैः क्षणैः यन्नवतामुपैति' ह्या न्यायाने मैथिलीशरणांच्या काव्याला 'रमणीय' हे विशेषण दिले, तर ते अनाठायी ठरणार नाही.

मैथिलीशरणांनी ज्या भाषेत काव्य लिहिले, ती भाषा 'खडी बोली हिंदी' म्हणून ओळखली जाते. खडी बोलीला काव्यभाषेची प्रतिष्ठा मिळून फार तर पन्नास वर्षे झाली असतील. परंतु या पन्नास वर्षांत खडी-बोली काव्याला जी समृद्धी लाभलेली आहे, तिचे सर्व श्रेय मैथिलीशरण गुप्त यांनाच द्यावयास पाहिजे. प्रसाद, पंत, महादेवी, निराला हे नंतरचे कवि-अग्रणी मैथिलीशरण गुप्तांच्या खांद्यावर उभे राहिले आणि म्हणूनच खडी-बोली हिंदी कवितेची मान गौरवाने ताठ उभी राहू शकली.

मैथिलीशरणांनी हिंदी काव्यक्षेत्रात पदार्पण केले, ते आचार्य महावीर प्रसाद द्विवेदी यांच्या प्रेरणेमुळे! आचार्य महावीर प्रसादांनी काव्यभाषेच्या बाबतीत फार मोठी क्रांती घडवून आणली. आजच्या खडीबोली हिंदी साहित्याचे आयुष्य फार तर १००-१२५ वर्षांचे आहे. तत्पूर्वी अधिकांश साहित्य व्रजभाषेत आणि काव्यस्वरूपात लिहिले जात असे. आचार्य महावीरप्रसाद द्विवेदींनी गद्य आणि पद्य यांची भाषा एकच असावी असा आग्रह धरला आणि तो मैथिलीशरण गुप्त, अयोध्यासिंह उपाध्याय आदींच्या साह्याने यशस्वी रीतीने व्यवहारातही पण आणला. कोणत्या प्रेरणेने हा उद्योग आचार्य द्विवेदींनी केला हे सांगणे कठीण आहे. अर्थात् तात्कालिक प्रेरणा हिंदीच्या राष्ट्रभाषा-पदाची होती.

१९०४ साली हिंदी साहित्य-संमेलनाची स्थापना झाली आणि मातृभाषा अथवा क्षेत्रभाषा ह्या नात्याने हिंदीच्या विकासाची योजना आंखीत असतांना, राष्ट्रभाषा म्हणूनही हिंदीच्या विकासाकडे अत्यंत लक्ष द्यावयास हवे, ही जाणीव हिंदी साहित्य-धुरीणांना झाली. राष्ट्रभाषेतील कविता एका भाषेत आणि गद्य-साहित्य दुसऱ्या भाषेत ही व्यवस्था राष्ट्रभाषा म्हणून हिंदी शिकणाऱ्या हिंदीतरभाषी लोकांच्या दृष्टीने गैरसोयीची होती. त्यामुळे काव्य आणि गद्य यांची भाषा एकच असावी आणि तीही खडी बोली असावी; या भावनेने आचार्य द्विवेदींच्या मनात मूळ धरले असावे. कदाचित् वर्डस्वर्थच्या 'The diction of poetry need not differ from the diction of prose. या शाश्वत

स्वच्छंदतावादी साहित्यसिद्धान्ताचा परिणाम म्हणूनही आचार्य द्विवेदींनी काव्यभाषेबाबतचे आपले धोरण आखले असावे. भाषेच्या बाबतीत केवळ ' निश्चयाचे बळ ' असून भागत नाही. त्याला व्यवहाराची-आदर्श व्यवहाराची-साथ मिळावी लागते. खडी बोलीच्या आदर्श व्यवहाराची साथ मैथिलीशरण गुप्तांनी आचार्य द्विवेदींना दिली आणि खडीबोली काव्यभाषेचे यशोमंदिर उभारले.

खडी बोलीतील प्रारंभिक रचनांना ब्रजभाषाभिमान्यांनी नाके मुरडली आणि एक आव्हान दिले की, स्फुट कविता खडी बोलीत लिहिली गेली, तरी महाकाव्याची रचना खडी बोलीत होणे शक्य नाही. हे आव्हान मैथिलीशरण गुप्त आणि अयोध्यासिंह उपाध्याय 'हरिऔध', यांनी स्वीकारले आणि दोन अत्युत्तम महाकाव्ये—' साकेत ' आणि ' प्रिय-प्रवास '—हिंदी साहित्यविश्वाला अर्पण केली. खडी बोली हिंदी जन्मभूमीत रुजली, अंकुरली, पल्लवित झाली ती या दोन महाकाव्यांमुळेच ! आणि या श्रेयातील ' सिंहाचा वाटा ' मैथिलीशरण गुप्तांकडेच जातो.

' साकेत 'च्या पूर्वीच आपल्या ' भारत-भारती ' या राष्ट्रीय भावनेने ओतप्रोत भरलेल्या रचनेने मैथिलीशरणांनी हिंदी साहित्यविश्वात आपले स्थान उच्च पदाला नेऊन पोहोचविले होते. ' भारत-भारती ' संबंधी अगदी यथार्थतेने असे म्हटले जाते की, तुलसीदासांचे ' राम-चरित-मानस' वगळल्यास 'भारत-भारती' इतका प्रचार आणि लोकप्रियता हिंदीतील कोणत्याही ग्रंथाला आजतागायत मिळालेली नाही. 'भारत-भारती ' हा गौरवशाली भूतकाळाचे स्मरण, वर्तमान दुःस्थितीचा साक्षात्कार आणि उज्ज्वल भविष्य काळाच्या दृढ आशांचा उच्चार यांचा त्रिवेणी संगम आहे.'भारत-भारतीने' तत्कालीन साहित्य-रसिकांना अक्षरशः वेड लावले;आणि 'भारतभारतीच्या'ओळीच्या ओळी साहित्य-रसिकांच्या जिव्हेवर नाचू लागल्या. मैथिलीशरणांची केवळ 'भारत-भारतीच' नव्हे, तर संपूर्ण काव्यसृष्टी राष्ट्रीय भावनेने दुमदुमलेली आहे. तसे नसते तर राष्ट्रपिता म० गांधींनी त्यांना ' राष्ट्रकवी ' ही पदवी अर्पण केलीच नसती. ही पदवी एका राजकारणी नेत्याने दुसऱ्या साहित्यस्रष्ट्याला अर्पण केली आहे, यातच त्या पदवीचे खरे मर्म आणि यश आहे.

राष्ट्रप्रेम हा जसा मैथिलीशरणांच्या काव्यकृतींचा एक स्थायी भाव आहे, त्याचप्रमाणे मर्यादा-पुरुषोत्तम रामचंद्राची अनन्यभक्ती हा त्यांचा दुसरा स्थायी भाव आहे. त्यामुळेच ' पंचवटी ' आणि ' साकेत ' यांसारखी रामायण-प्रसंगावर आधारलेली काव्ये त्यांनी लिहिली. परंतु अनन्य रामभक्तीने मैथिलीशरण गुप्तांच्या ठायी कुठल्याही प्रकारची सांप्रदायिकता, आग्रही धार्मिकता निर्माण केली नाही. महाभारत कथेवर आधारित ' जयद्रथ-वध ' ' द्वापर ' वगैरे रचनाही पण त्यांनी तितक्याच आत्मीयतेने हिंदी साहित्य-जगताला सादर केलेल्या आहेत. इतकेच नव्हे, तर ' यशोधरे 'मध्ये गौतम-पत्नीच्या निमित्ताने त्यांनी बुद्धदेवाचे गौरव-गान करावयास कमी केलेले नाही. मैथिलीशरण गुप्तांच्या काव्य-कथा ह्या जरी पुराणकालीन असल्या तरी पुरातनवादाचे दर्शन मात्र त्यांच्या काव्य-कृतीतून होत नाही. कथा पुराणातील पण विवेचन मात्र सर्वथैव नवीन दृष्टिकोणावर आधारलेले, ही मैथिलीशरण गुप्तांच्या पिंडाची बैठक आहे. गौरवशाली इतिहास एखाद्या देशाला लाभणे हे त्या देशाचे महत्भाग्य होय, ही मैथिली-शरणांची अढळ श्रद्धा आहे. आज जरी आम्ही दुःस्थितीत असलो, तरी भूतकाळी आम्ही सुस्थितीत होतो, हे स्मरणच उज्ज्वल भविष्यकाळाला प्रेरणा देणारे असते; ह्या निष्ठेनेच त्यांनी काव्य-विषय म्हणून पुराणकथा निवडल्या. इतिहासाचे स्मरण जर वर्तमानकाळाकडे पाठ फिरण्याची प्रेरणा देत असेल तर ते मैथिलीशरणांना नको आहे. माणसाने प्राप्त काळाशी सुसंबद्ध असेच वर्तन ठेवले पाहिजे, ही गोष्ट ' द्वापर 'मध्ये त्यांनी एक समर्पक दृष्टान्त देऊन प्रस्थापित केली आहे. हिवाळा असतो. ऊब यावी म्हणून माणसे घोंगड्या वापरतात. हिवाळा संपतो; उन्हाळा सुरु होतो. लोक घोंगड्या टाकून मलमलीचा आश्रय घेतात. कालानुरूप बदल हा माणसात व्हावयासच हवा. त्याच-प्रमाणे ' जुने ते सर्व टाकाऊ ' हा भ्रमहि मैथिलीशरणांनी दूर केलेला आहे. ' पंचवटी ' या काव्यात त्यांनी म्हटले आहे—

" परिवर्तन ही यदि उन्नति है, तो हम बढते जाते हैं ।

किंतु मुझे तो सीधे सच्चे, पूर्वभाव ही भाते हैं ॥ "

केवळ नावीन्य म्हणून नावीन्याचा सोस त्यांनी कधी बाळगला नाही.

मैथिलीशरण नव्यातले नवे होते, याबद्दलचा सर्वात प्रबळ पुरावा म्हणजे त्यांनी आपल्या रचनांतून अंगिकारलेला ' स्त्री ' विषयक अत्यंत उदार दृष्टिकोण होय. ' साकेत ',

'यशोधरा', 'द्वापर' ही तीन काव्ये त्यांच्या स्त्रीविषयक उदार दृष्टिकोनाची साक्ष देण्यास समर्थ आहेत. रामायण कथेतील कैकेयी ही एक दुष्ट, खाष्ट स्त्री एवढाच आमचा तिच्याबद्दलचा ग्रह आहे. मैथिलीशरणांनी 'साकेत' मध्ये ह्याच दुष्टा कैकेयीच्या दुष्कृत्यांचा अत्यंत सहानुभूतिपूर्वक विचार करून प्रभू रामचंद्रांच्या करवी तिला अभूतपूर्व असा गौरव प्रदान केलेला आहे. आपल्या दुष्कृत्यांमुळे आपला पोटचा पोर देखील आपल्याला पारखा झाला या भावनेने जेव्हा कैकेयी पश्चात्तापदग्ध होते, त्यावेळेस तिचे सांत्वन करण्याच्या निमित्ताने रामचंद्र म्हणतात.

" सौ वार धन्य वह एक लाल की माई।
जिस जननीने है जना भरत-सा भाई ॥

भरताला जन्म देणे हे प्रचण्ड पुण्य जोपर्यंत कैकेयीच्या गाठी आहे, तोपर्यंत तिची इतर असंख्य पापे क्षम्य आहेत.

हिंदी आणि बंगाली ह्या दोघी शेजारणी ! रवींद्रनाथांनी 'काव्येर उपेक्षिता' नांवाचा लेख लिहून साहित्यांतील उपेक्षित नारीरत्नांचा संकेत केला. आचार्य महावीरप्रसाद द्विवेदींनी त्याचा अनुवाद करून रवींद्रनाथांच्या विचारांना दुजोरा दिला. मैथिलीशरणांनी ह्या विचार आत्मसात करून एका उपेक्षितेला—ऊर्मिलेला—अत्यंत मानाचें स्थान मिळवून दिले. वाल्मीकी अथवा तुलसी ह्या दोघांही रामकवींचे लक्ष ऊर्मिलेकडे गेलेच नव्हते. मैथिलीशरणांनी 'मूक' ऊर्मिलेला बोलकी केली. तिच्या वियोगदुःखाला वाचा फोडली आणि तीही इतक्या प्रखर रीतीने की महात्मा गांधींना आक्षेप घेण्याची बुद्धि झाली की, 'साकेत' सारख्या काव्यामध्ये ऊर्मिलेच्या अश्रूंना अवास्तव माहात्म्य प्राप्त झाले आहे. औचित्य-अनौचित्याचा विचार बाजूला ठेवला तर ऊर्मिलेचा विलाप हा 'साकेत' महाकाव्यातील अत्यंत हृद्य भाग आहे, हे कोणीही रसिक, नव्हे अरसिक देखील, मान्य करील.

ऊर्मिलेच्या जोडीची काव्यातील दुसरी उपेक्षिता म्हणजे गौतमपत्नी यशोधरा ! ह्या यशोधरेचे उज्ज्वल जीवन प्रकाशात आणण्यासाठी मैथिलीशरणांनी 'यशोधरा' हे काव्य लिहिले आणि शुद्धोधनाच्या करवी यशोधरेची महत्ता स्पष्ट केली.

" गोपा बिना गौतम भी ग्राह्य नही मुझको ! "

'द्वापर' ह्या कृष्णवियोग प्रधान काव्यात 'विधृता' आणि कुब्जा ह्या दोन स्त्रियांना याच उदारमतवादी दृष्टिकोणामुळे अतिशय महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले आहे.

आचार्य महावीर प्रसाद द्विवेदींच्या प्रेरणेने मैथिलीशरण गुप्तांनी खडी बोलीला काव्य भाषा म्हणून आत्मसात केले; त्याचप्रमाणे व्रजभाषा-काव्यातून चालत आलेल्या काही काव्यपरंपराही पण सोडून देऊन, नवीन, निरोगी परंपरा स्थापन करण्याचे श्रेयही मिळविले. हिंदी साहित्याच्या इतिहासातील रीति-काळांत ( म्हणजे इ० स० १७०० ते १८५० ) स्त्रीचे वर्णन एक उपभोग्य वस्तु, शय्यादासी म्हणूनच होत असे. मैथिलीशरणांच्या काव्यात स्त्रीबद्दलची शरीरासक्ती कोठेच आढळणार नाही. इतकेच नव्हे, तर 'द्वापर' ह्या पूर्वोल्लेखित काव्यकृतीमध्ये विधृतेच्या तोंडून या इंद्रियासक्त परंपरेवर त्यांनी जबरदस्त प्रहार केलेला आहे. विधृता म्हणते—

'नारी ने क्या कोरी देह ही है पायी ?'

मैथिलीशरणांची आधुनिकता त्यांच्या 'स्त्रीला मन असते, प्रतिष्ठा असते, अभिमान असतो,' या श्रद्धेमध्ये आहे.

याच श्रद्धेचा परिणाम म्हणून मैथिलीशरणांच्या नायिका विरह-वर्णनातही एक निराळी अपूर्वाई आढळते. रीतिकाळामध्ये विरह वर्णन हे बाह्य-वस्तुपरक असे. विरहाने स्त्री किती कृश झाली, तिच्या भुजदण्डातील स्वर्णवलये गळून खाली पडली किंवा अंगठी भुजबंध म्हणून वापरली जाऊ लागली, अशाच प्रकारची वर्णने उपलब्ध होतात. काही ठिकाणी या वर्णनांचा अतिरेक होऊन त्यात बीभत्सतादेखील येते. मैथिलीशरणांनी आपली कविता ह्याही घातक परंपरेपासून मुक्त ठेवलेली आहे. 'यशोधरे' मध्ये गौतमपत्नी गोपेचा विरह-वर्णन करीत असताना बाह्य सृष्टीत शरीरावर झालेल्या परिणामापेक्षा, विरहामुळे गोपेच्या अंतःकरणात काय खळबळ उडाली, केवढे काहूर उसळले, कोणती वादळे माजली, याचेच वर्णन अधिक केलेले आहे.

मैथिलीशरणांनी हिंदी कवितेला केवळ नवीन भाव दिले एवढेच नव्हे, तर त्यांनी हिंदी कथा-काव्याला अनेक प्रकारच्या कथन शैलींनी समृद्ध केले.

हिंदीचे स्व-नामधन्य समीक्षक प्रवर आ० रामचंद्र शुक्ल यांनी प्रबंधकवीची विशेषता म्हणून, घटनाप्रवाहातील मार्मिक स्थळांची पारख हा गुण म्हणून सांगितलेला आहे. ह्या गुणाचा प्रत्यय मैथिलीशरण गुप्तांच्या कथा-

काव्यात आपणाला ठायी ठायी येतो. उदाहरण म्हणून रामायण-कथेतील 'शूर्पणखा' प्रकरणाचा उल्लेख करता येईल. तुलसीदासांनी आपल्या 'रामचरित मानस'मध्ये ह्या प्रसंगाचे वर्णन अत्यंत शुष्क रीतीने केलेले आहे. त्याच प्रसंगावर आधारलेले मैथिलीशरणांचे 'पंचवटी' हे काव्य वाचले म्हणजे हा कथाभाग किती रसपूर्ण करता यावा याचा अंदाज रसिकमनाला सहज येतो. ह्या प्रतीतीची साक्ष म्हणून मी एवढेच म्हणेन कीं, ज्या ज्या मराठी भाषिकांनी हे काव्य वाचले, त्यातील काव्यात्मक प्रकृतीच्या लोकांनी प्रथम जर कोणती गोष्ट केली असेल, तर ती म्हणजे 'पंचवटी' चे मराठींत भाषांतर करणे ही होय. एकट्या पुण्यातच आज अशी दोनतीन तरी भाषांतरे हस्तलिखित स्वरूपात उपलब्ध आहेत.

कथनशैलीचा दुसरा प्रयोग म्हणून मैथिलीशरण गुप्तांच्या 'साकेत' ह्या महाकाव्याकडे बोट दाखविता येईल. 'साकेत' हे स्थलसूचक शीर्षक आहे. याचे कारण असे की, यांत वर्णिलेल्या साऱ्या घटना 'साकेत' (अयोध्येचे पूर्वीचे नांव) मध्ये घडतात. रामायणाच्या संपूर्ण गोष्टीची रचना अशा प्रकारे करणे की, ज्यात स्थलैक्य-सिद्धांताचे पूर्णपणे पालन होईल. हा प्रयत्न निस्संशय धाडसाचा आहे, आणि अभिनंदनीयही आहे यात शंकाच नाहीं. रामायणासारखी विस्तृत कथा एका ठिकाणी केंद्रित करण्याच्या ह्या प्रयत्नामध्ये मैथिलीशरणांसारख्या सिद्ध-हस्त कवीच्या हातूनही काही दोष राहून गेले आहेत. परंतु हे अपयश त्यांनी केलेल्या धाडशी प्रयत्नाच्या गौरवापुढे काहीच नाही.

कथनशैलीचा अत्याधुनिक व अभिनव असा प्रयोग त्यांच्या 'द्वापर' या कृष्णजीवनसंबद्ध खंडकाव्यात आढळतो. या काव्यातून कवीने ऐतिहासिक कथनप्रणालीचा अवलंब केलेला नाही. श्रीकृष्णाच्या सहवासात आलेल्या १०।१५ व्यक्तींना कवीने या काव्यात एकत्र गोवलेले आहे आणि प्रत्येकाला आत्मकथन करण्याची मुभा दिलेली आहे. असे असूनही कथा दाही दिशांना स्वैर उधळत नाही, तर एकाच दिशेने पुढे पाऊल टाकीत जाते; अन् ती दिशा म्हणजे श्रीकृष्ण-माहात्म्य ही होय!

मैथिलीशरणांचे आणखीही एका दृष्टीने महत्त्व आहे आणि ते म्हणजे—ते जसे प्रबंध काव्याचे कथाकार होते, तसेच उत्कृष्ट गीत काव्याचे गायकही पण होते. 'साकेत' मधली उर्मिलेची गीते ही हिंदीतल्या आजच्या प्रथितयश गीतकाव्य-गायकांच्या प्रतिभेला मागे टाकणारी आहेत, याबद्दल कोणाचेही दुमत होणार नाही.

महात्मा गांधींनी मैथिलीशरणांच्या कवितेतील राष्ट्रीय भावनेचा प्रबल स्वर ऐकून त्यांना 'राष्ट्रकवी' ही पदवी दिली. पण मैथिलीशरणांची राष्ट्रीयता ही संकुचित स्वरूपाची नव्हती जवाहरलाल नेहरूंच्या वाढदिवशी भरलेल्या साहित्यगोष्ठीच्या निमित्ताने मैथिलीशरणांनी 'विश्व-राज्य' ही कविता लिहिलेली आहे. तींत त्यांनी म्हटले आहे की, 'प्रत्येकजण जर हा माझा देश म्हणून भूमंडळाचे लचके तोडू लागला, तर मग हे जग कोणाचे? ही पृथ्वी कोणाची? ही धरित्रीमाता कोणाची?' अशा आंतरराष्ट्रीय वृत्तीच्या राष्ट्रकवीच्या मृत्यूने साऱ्या भारतीय जनतेला हळहळ वाटावी यात नवल ते कसले?

---



अनुक्रमणिका

# राजवाडे यांचे भाषाशास्त्रविषयक कार्य

● शं. गो. तुळपुळे ●

( ' मुंबई मराठी साहित्य संघा ' त जानेवारी १९६५ मध्ये दिलेले व्याख्यान )

विश्वनाथ काशीनाथ राजवाडे इतिहासाचार्य म्हणून प्रसिद्ध असले तरी त्यांची खरी महती भाषाचार्य म्हणून मानावी लागेल. निदान या दुसऱ्या क्षेत्रातील त्यांचे कार्य पहिल्या, म्हणजे इतिहासाच्या क्षेत्रातील कार्यापेक्षा कोणत्याही दृष्टीने कमी नाही; उलट असेलच तर सरस आहे. इ. स. १८९२ पासून त्यांनी जो भाषाभ्यास सुरू केला तो त्यांच्या अखेरीपर्यंत, म्हणजे इ. स. १९२६ पर्यंत अखंड चालू होता. ' सुबन्त विचारा 'च्या प्रस्तावनेत ते म्हणतात, " गेली वीस वर्षे ( शके १८१४ पासून ) मराठी भाषेचा उगम मी शोधीत आहे." त्यांचा हा शोध त्यांच्याबरोबरच संपला. मध्यंतरीच्या काळात त्यांनी अनेक विषयांचा छंद घेतला. उदा० भाषांतर, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, समाजशास्त्र, शासन, आरोग्य वगैरे. परंतु, इतिहासाशिवाय वरीलपैकी अन्य विषयावर त्यांची मती स्थिर होऊ शकली नाही. इतिहासावर ती पुष्कळ प्रमाणात स्थिर झाली हे खरे; तथापि त्या क्षेत्रातही साधनांचे खंड व त्यांच्या प्रस्तावना यांव्यतिरिक्त विशेष कार्य राजवाड्यांनी केले नाही. किंबहुना, डॉ. केतकर म्हणतात त्याप्रमाणे, पानिपतचा प्रसंग व ब्रम्हेंद्रस्वामींचे प्रकरण या दोन विषयांशिवाय अन्य ऐतिहासिक विषयाचा पद्धतशीर अभ्यास असा त्यांनी केलाच नाही. इतिहासाच्या क्षेत्रात त्यांचे कार्य मुख्यतः साधने मिळवून त्यांचे प्रसिद्धीकरण व जुळवाजुळव करण्याचे आहे. काही प्रसंगी त्यांनी इतिहासाचे तत्त्वज्ञान सांगण्याचा प्रयत्न केला; नाही असें नाही. परंतु एकंदरीने असे प्रसंग थोडे. याच्या उलट भाषाभ्यास त्यांनी अनेक दृष्टिकोनांतून केला : तत्त्वतः केला, तपशिलवार केला, कालसापेक्ष केला, स्थलसापेक्षही केला, ध्वनिदृष्ट्या केला, तसेच व्याकरणदृष्ट्याही केला; ऐतिहासिक पद्धतीबरोबर थोडाफार वर्णनात्मक पद्धतीनेही केला. भाषाभ्यासाच्या या क्षेत्रात त्यांची गती खरोखरच अप्रतिहत होती. तसेच हा अभ्यास त्यांनी एक प्रकारच्या निष्ठेने व संस्कृतिविकासाच्या व्यापक दृष्टीतून केला. म्हणूनच राजवाड्यांच्या कार्याचे मोजमाप करताना डॉ. केतकर त्यांच्या भाषाविषयक कार्यास अग्रस्थान देतात. ते म्हणतात,

" राजवाडे यांचे इतिहाससंशोधकापेक्षा भाषाशास्त्रसंवर्धक या नात्याने काम अधिक झाले. त्यांस भाषाशास्त्रज्ञ म्हणावे लागेल व त्यांची गणना अत्यंत मोठ्या वैयाकरणांत करावी लागेल. हेमचंद्र व वररुचि यांचे प्रयत्न राजवाड्यांच्या प्रयत्नांच्या दृष्टीने काहीच नाहीत. इतिहासाचार्य किंवा इतिहाससंशोधक हे नाव राजवाड्यांना देण्यात आपण त्यांच्या कार्याचे अज्ञान दाखवू. त्यांच्या बौद्धिक कार्याचे गुरुलघुत्व माझ्या मते ( १ ) भाषाशास्त्रज्ञ, ( २ ) वैयाकरण, ( ३ ) शब्दसंग्राहक, ( ४ ) इतिहाससंशोधक या अनुक्रमाने आहे. "

–(' रा० यांची जीवनपद्धती '–विद्यासेवक, ३-११-४३ )

सारांश, राजवाडे अभ्यासाची नित्य नवी क्षेत्रे धुंडाळीत असले किंवा ' Tomorrow to fields fresh and pastures anew ' या वृत्तीने काम करीत असले, तरी भाषाभ्यास हा त्यांच्या बुद्धिमत्तेचा स्थायिभाव होता असे म्हणता येईल.

भाषाभ्यासाचे हे कार्य त्यांनी पंडितबुद्धीने नव्हे, तर राष्ट्रभावनेने केले. त्याकडे त्यांनी संस्कृतिविकासाचे एक अंग या दृष्टीने पाहिले. त्यांनी एका ठिकाणी म्हटले आहे, " व्याकरणशास्त्र हे समाजशास्त्र, इतिहासशास्त्र व मानववंशशास्त्र यांचे मोठे उपकारक आहे. " साहजिकच व्याकरणशास्त्र ते वरील सामाजिक शास्त्रांचे अंगभूत मानीत, स्वतंत्र नव्हे. संस्कृत भाषेतील द्विवचनाचा उलगडा त्यांनी प्राचीन आर्य समाजाच्या ' त्रैकावस्थे '-च्या आधारे कसा केला आहे ते या दृष्टीने पाहण्यासारखे आहे. संस्कृत भाषेच्या प्रथमावस्थेत ती भाषा बोलणारा आर्यांचा समाज तिहीहून अधिक संख्यागणना करण्यास असमर्थ होता व ह्या त्यांच्या बौद्धिक अडाणीपणात त्यांच्या भाषेतील द्विवचनाचे बीज आहे, हे राजवाड्यांचे म्हणणे पटण्यासारखे नसले तरी ते व्याकरणशास्त्राकडे पाहण्याच्या त्यांच्या सामाजिक दृष्टीचे द्योतक आहे यात शंका नाही. + या सामाजिक दृष्टीबरोबरच त्यांच्या

+ संस्कृत भाषेचा उलगडा, पृ. ३–५

ठिकाणी राष्ट्रभावनेतून निर्माण होणारी व्यक्तिपूजाही आढळते. पाणिनीच्या व्याकरणाला 'one of the greatest monuments of human intelligence' याप्रमाणे गौरविणारे ब्लूमफील्डसारखे पश्चिमात्य विद्वान आहेत; परंतु राजवाडे यांची पाणिनीवरील निष्ठा काही अपूर्वच होती. ती आपल्या कृतीने व्यक्त करून, म्हणजे त्याच्या 'अष्टाध्यायी 'च्या पद्धतीवर ज्ञानेश्वरीचे व्याकरण लिहून, त्यांचे समाधान झाले नाही म्हणूनच की काय, त्यांनी पाणिनीचा व त्याच्या शास्त्रपद्धतीचा पुन्हा पुन्हा गौरव केला आहे. या दृष्टीने त्यांची पाणिनिपूजा दर्शविणारे दोन उतारे पुढे देतो :—

आदिमानवाच्या "त्या ध्वन्यनुकारक, अप्रत्यय, प्राथमिक भाषेचा मागमूस अद्यापही संस्कृत भाषेत बराच राहिलेला आहे. हा मागमूस **पाणिनीने** दाखवून दिलेला आहे. धन्य आहे त्याच्या पृथक्करणशैलीची की बहुतेक सर्व संस्कृत शब्दांची धातुबीजे प्रत्ययोपसर्गांची टरफले सोलून काढून त्याने धुतल्या तांदळाप्रमाणे मोकळी करून ठेविली आहेत."

("विकारविचारप्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांती," पृ. २२५)

"मी तर असे म्हणतो की, भगवान पाणिनी यांच्या अष्टाध्यायीत चुकी आहे असे म्हणणारा मनुष्य स्वतःच चुकत आहे असे बिनदिक्कत म्हणावे. शब्दशास्त्राचा पाणिनीइतका चोख ज्ञाता होता, की त्याच्या सूत्रांत एकही चुकी आढळावयाची नाही. फार काय, भूमितिशास्त्राप्रमाणे पाणिनिप्रणीत व्याकरण-सूत्राष्टक केवळ अचूक आहे."

(राजवाडे-लेखसंग्रह, भा. ३, पाणिनी : कालनिर्णय-शंकांचा समाचार, पृ. १३९.)

पाणिनीविषयीची ही असीम निष्ठा रावाडयांच्या लिहिण्यात पदोपदी दिसून येते. 'सुबन्त-विचारा'त पिशेलच्या प्राकृत भाषांवरील प्रबंधाची महती ते सांगतात; परंतु त्याबरोबरच त्याच्या विवेचनातील उणिवा दाखवून 'पर्वती आणि प्रचंडगड यांच्यामध्ये जे अंतर आहे ते पिशेल व पाणिनी यांच्यामध्ये आहे' असे म्हणण्यास कमी करीत नाहीत. तसेच ज्ञानेश्वरीतील द्विवचनाची चर्चा करतांना महाराष्ट्री व अपभ्रंश भाषांच्या व्याकरणात द्विवचनाचा उल्लेख न केल्याबद्दल ते वररुचि-हेमचंद्रांना दोष देतात आणि त्यांची दृष्टी 'पाणिनीप्रमाणे सर्वंकष नव्हती व ते दडपेबाजीचे नियम देतात' अशी वर कठोर टीकाही करतात (ज्ञा. चे व्याकरण, पृ. २०).

तात्पर्य, राजवाड्यांचे व्याकरणशास्त्र सर्वस्वी पाणिनीच्या अष्टाध्यायीवर आधारलेले आहे. ज्ञानेश्वरीचे व्याकरण रचताना त्यांनी पाणिनीचा आधार पदोपदी घेतलेला दिसतो. ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे रूप अन् रूप, प्रत्यय अन् प्रत्यय, पाणिनीय संस्कृतापासूनच सिद्ध होतो या पूर्वग्रहाने ते या कामास लागलेले दिसतात. तसेच पाणिनीय व्याकरणातील धातूंची 'लकार' व्यवस्थाही त्यांनी मराठीवर जशीच्या तशी बसवून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, तोही अवास्तव वाटतो. याबाबत डॉ. कत्रे यांनी केलेली 'The imposition of a Pāṇinian Structure on modern Indo-Aryan Linguistics' ही टीका रास्तच म्हटली पाहिजे. राजवाडे मात्र आपल्या 'सुबन्त-विचारा'चे फलित म्हणून स्पष्टपणे सांगतात की "मराठीतील एकोन एक लहान व मोठ्या लकबा भगवान पाणिनीच्या अष्टाध्यायीत नमूद आहेत."(पृ. ८७)

याचा अर्थ राजवाड्यांना शास्त्रीय दृष्टीच नव्हती, ते पाणिनीचे केवळ अनुवादक होते, असा मात्र नव्हे. उलट त्यांच्या ठिकाणी शास्त्रीय दृष्टी विशेषत्वाने होती. 'सुबन्त-विचारा'त ते म्हणतात,

"शास्त्र म्हणजे सामान्य सिद्धान्तांची परंपरा. काहीएक कार्य आहे व ते काही नामांना, सर्वनामांना, धातुरूपांना व अव्ययांना होत आहे. तर तत्कार्यप्रीत्यर्थ नामे, सर्वनामे, धातुरूपे व अव्यये एके ठिकाणी आणली पाहिजेत. तात्पर्य, व्याकरणशास्त्र रचावयाचे म्हणजे प्रथम अत्यंत सामान्य कार्याचा शोध करावयाचा आणि शेवटी सर्वांहून कमी व्यापक अशा सामान्य कार्याचा शोध करावयाचा; आणि सरतेशेवटी जेथे सामान्य कार्य सापडत नाही, तेथे निपात करावयाचा (पृ. ७८).

याच प्रबंधात भाषेची कला व भाषेचे शास्त्र यांमधील फरक सांगताना ते म्हणतात:

"भट्टोजी दीक्षिताची कौमुदी रूपसिद्धीच्या दृष्टीने सर्वोत्तम आहे; परंतु शास्त्रदृष्टीने अधम आहे. शुद्ध रूपे कशी करावी व कशी साधावी ही कला कौमुदी शिकविते. म्हणजे भट्टोजीची कौमुदी हा कलाग्रंथ आहे, आणि कलाग्रंथ जे पढतात ते कलावंत होतील व नाना प्रकारची

लहानमोठी व प्रसिद्धाप्रसिद्ध शुद्ध रूपे साधतील; परंतु व्याकरणशास्त्रज्ञ होणार नाहीत. पाणिनी याचा शास्त्र-दृष्टीने अभ्यास करावयाचा म्हणजे अष्टाध्यायीवरून अधिकरणवारच केला पाहिजे. प्रत्येक अधिकरण म्हणजे तद्विषयक सामान्य कार्यांची उतरती किंवा चढती परंपरा आहे. स्वतः अधिकरणेही सामान्य कार्यांची एक मोठी परिनालिका आहे. ह्या पाणिनीय धर्तीवरच मराठी व्याकरणशास्त्राची इमारत उभारली पाहिजे.... कोणत्याही भाषेचे व्याकरण-शास्त्र रचावयाचे म्हणजे शुद्ध रूपांची सिद्धी करीत बसावयाचे नाही. शास्त्र रचताना रूपसिद्धी सहजच होत असते. शास्त्र म्हणजे मूलतत्त्वरूप बीजापासून संपूर्ण भाषावृक्षाचा विस्तार कोणत्या परिनालिकेने कसकसा फैलावला गेला, ते दाखवावयाचे. ''

( 'सुबन्तविचार', पृ. ७९ )

अर्थात, राजवाड्यांना शास्त्रीय पद्धतीची जाणीव चांगलीच होती. या दृष्टीने मराठी भाषेचे व्याकरणशास्त्र निर्माण करू पाहणाऱ्यांना त्यांनी केलेली सूचना महत्त्वाची आहे. ती अशी, की अद्यापि मराठीचे **अवलोकन** व **अवलक्षण** ( ओळख ) व्हावयाची आहेत; ती झाल्यावर व्याकरणाशास्त्राच्या गोष्टी बोलता येतील. ते म्हणतात, " अद्यापि व्युत्पत्तिद्वारा शब्दांची व प्रत्ययांची व धातूंची रूपे यथातथा ओळखण्याचे काम व्हावयाचे आहे. शब्द-व्युत्पत्तीचे हे पूर्वकृत्य प्रथम करावे आणि मग शास्त्रीय व्याकरण रचावे ". व्याकरणाविषयी राजवाड्यांनी जे तात्त्विक विचार व्यक्त केले आहेत त्यांतही वरील शास्त्रीय दृष्टी दिसून येते.

व्याकरणाच्या स्वरूपाविषयी त्यांनी पुढील चार सिद्धान्त मांडले आहेत :—

" १. व्याकरण हे प्रायोगिक शास्त्र नाही; ते आवलोकनिक शास्त्र आहे.

२. वाक्य, शब्द व वर्ण हे व्याकरणाच्या अवलोकनाचे विषय होत.

३. संपूर्ण शब्दोदधीचे अवलोकन करून वर्णांचे, शब्दांचे व वाक्यांचे वर्णन करणे हे व्याकरणशास्त्राचे एक प्रयोजन होय.

४. शब्दसिद्धीच्या सामान्य नियमांची परंपरा अपवादां-सह नमूद करणे हे त्याचे दुसरे प्रयोजन होय.

अर्थात वर्णन हे मुख्य. त्याचे साहाय्यक यंत्र म्हणजे शब्दाचा इतिहास किंवा व्युत्पत्ती. ''

वरील विचार राजवाड्यांनी दामल्यांच्या व्याकरणाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने व्यक्त केले आहेत. असेच भाषाविषयक आणखी काही तात्त्विक स्वरूपाचे विचार त्यांनी अन्यत्रही मांडले आहेत व ते शास्त्रशुद्ध आहेत. उदा०, भाषा मुद्दाम बनविणे व ती बनवून प्रचारात आणणे या गोष्टी मानवी इतिहासात अशक्य आहेत; भाषा आपोआप बनत जाते व ती बनण्याची कारणे तद्बाह्य असतात ( उदा० उर्दू भाषा ),—हा त्यांचा विचार पाहावा.[1] तसेच फारसी भाषेच्या मराठीवर झालेल्या परिणामासंबंधी लिहिताना " परभाषेतील केवळ शब्द व प्रयोग घेतल्याने भाषेच्या अंतःस्वरूपाला धक्का पोचत नाही; पण उभयान्वयी व शब्दप्रयोगी अव्यये आणि विभक्तिप्रत्यय व उच्चार परकीय आले की भाषेचे स्वरूप बदलते; " हा त्यांनी मांडलेला विचारही शास्त्रदृष्ट्या योग्य आहे. भाषेच्या प्रगतीच्या चार पायऱ्या ते सांगतात त्या अशा :—

१. विश्लिष्टअक्षरात्मक ( Monosyllabic ), उदा०, चिनी.

२. श्लिष्टअक्षरात्मक ( Agglutinative ), उदा०, तुर्की.

३. विकृतिक्षम ( Inflected ), उदा०, संस्कृत.

४. त्यक्तविकृती ( Analytical ), उदा०, इंग्रजी, फारसी, मराठी.

भाषा व ती बोलणाऱ्या राष्ट्राची संस्कृती याविषयी त्यांनी काही तत्त्वचिंतन केले असून ते त्यांनी फारसी–मराठी व इंग्रजी–मराठी यांच्या संबंधात प्रगट केले आहे. याबाबत त्यांचा सिद्धान्त असा की, " भाषेचा संकोच म्हणजे आपल्या हालचालींचा संकोच. म्हणून आपल्या हालचाली वाढविल्या पाहिजेत. निरनिराळ्या क्षेत्रांत कर्तबगारी वाढविली पाहिजे. स्वदेशाचे हित व स्वभाषेचा उपयोग हे शब्द समानार्थक होत. ''

वरील सर्व विचार राजवाड्यांनी स्वतंत्रपणे मांडलेले नाहीत; तर 'ऐतिहासिक प्रस्तावना' च्या ८ व्या खंडात फारसी-मराठी संबंध स्पष्ट करताना त्यांना ते सुचले आहेत. या विचारांत नवीन असे विशेष नसले तरी ते शास्त्राला

१. ऐतिहासिक प्रस्तावना, खं. ८ वा, पृ. ४१३.

धरून आहेत. शास्त्रीय परंतु नवीन असा भाषाविषयक सर्वसाधारण स्वरूपाचा विचार त्यांनी आपल्या ' विकार-विचारप्रदर्शनाच्या साधनांची इतिहासपूर्व व इतिहासोत्तर क्रांती ' या निबंधात मांडला आहे. ( ' लेखसंग्रह ', भा. ३ ). त्यात विकारविचारप्रदर्शनाची पुढील चार साधने त्यांनी सांगितली असून ती साधने व त्यांची साध्ये यांचे एक कोष्टकही त्यांनी दिले आहे.

१. विक्षेप किंवा हावभाव.
२. ध्वनी, त्यांचे अनुकरण, व त्यातून भाषानिर्मिती.
३. चित्र ( रेखांच्या द्वारा ).
४. स्थापत्य, शिल्प ( प्रतिकृतीच्या द्वारा ).

वरील चार साधनांपैकी ध्वनी व त्यातून निर्माण होणाऱ्या भाषा या साधनाचा त्यांनी अधिक विचार केला असून नादानुकरणाच्या परंपरेप्रमाणे कोणत्याही भाषेत प्रथम शब्दजन्य प्राणिनामे ( उदा०, काक ), नंतर पदार्थ ( उदा०, घरघरा ), वं शेवटी क्रिया ( उदा०, पडणे, धावणे, खाणे इ० ) यांचे वाचक शब्द वरील क्रमाने कसे निर्माण होतात ते कौशल्याने दाखविले आहे. याच निबंधात शब्दाच्या ' संबंधी अर्थां ( allied meanings ) विषयी त्यांनी व्यक्त केलेले विचार असेच स्वतंत्र आहेत. √उष्-दाहे या एका पाणिनीय धातूपासून उष्ट्र ( उंट ), उषर ( ओसाड माळ ), उष्णीश ( शिरोवेष ), उषा ( प्रभात ) व उषस् ( संध्याराग ) हे निरनिराळे संबंधी शब्द कसे निर्माण होतात ते राजवाड्यांनी कौशल्याने दाखवून दिले आहे.

याप्रमाणे राजवाडयांची भाषेकडे पाहण्याची दृष्टी शास्त्रीय आहे. त्यांची भूमिका मात्र राष्ट्रीय आहे. या दोन वृत्तींत जेव्हा विरोध निर्माण होतो तेव्हा राजवाड्यांची स्थिती चमत्कारिक होते व मग ते कधी बुद्धीची तर कधी भावनेची बाजू घेतात. शास्त्रदृष्टी किंवा बुद्धी प्रभावी ठरते तेव्हा त्यांच्या हातून ज्ञानेश्वरीच्या व्याकरणासारखी किंवा सुबन्त-तिङन्त विचारासारखी शास्त्रीय विवेचने उतरतात; आणि राष्ट्रीय भावना किंवा अहंकार प्रभावी ठरतो तेव्हा ते फा० स्टीफन्सच्या ' क्रिस्तपुराणा 'च्या भाषेची चीरफाड करून ती अशिष्ट आणि गावठळ ठरवितात. मग त्यांना पाणिनी हा सर्वज्ञ भाषाशास्त्रकार वाटतो व जे जे अपाणिनीय ते सर्व त्यांच्या दृष्टीने कुचकामाचे ठरते. सारांश, राजवाडयांच्या मनात बुद्धी आणि भावना, शास्त्र व अभिमान यांचा झगडा सतत चाललेला दिसतो. या झगडयातूनच त्यांचे भाषाविषयक निरनिराळे विचार जन्मास आले. राजवाडे कष्टाळू होते, दीर्घोद्योगी होते, एकाच विषयाचा मनाला सतत ध्यास लावून घेऊन त्याचा पाठपुरावा करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी होते. त्यामुळे त्यांच्या हातून भाषाभ्यासाच्या या क्षेत्रात विविध व भरदार स्वरूपाचे लेखन झाले. त्याचा संपूर्ण अभ्यास करून त्यावरून राजवाडयांच्या भाषा व भाषाशास्त्रविषयक कार्याचे मूल्यमापन करणे हा एक स्वतंत्र उद्योग आहे. तो करण्यास प्रस्तुत निबंधात सवड नाही. येथे त्यांच्या भाषाविषयक लेखनाचा धावता परिचय करून देऊन त्यावरून त्यांच्या एतद्विषयक कार्याचा आढावा घेणे एवढेच शक्य आहे. ते करण्यासाठी प्रथम राजवाडयांनी भाषाभ्यासाची जी निरनिराळी दालने उघडून दाखविली ती विचारात घेऊन शक्य तर त्यांचे वर्गीकरण केले पाहिजे. हे वर्गीकरण केल्यानंतर या निरनिराळ्या क्षेत्रांत त्यांनी जे शुद्धाशुद्ध व नवेजुने विचार मांडले त्यांची छाननी केली पाहिजे. शेवटी हे सर्व विचार एकत्र करून त्यांवरून त्यांच्या भाषा व भाषाशास्त्रविषयक सिद्धान्तांची एक मालिका बनविली पाहिजे, एक शास्त्र बनविले पाहिजे. त्यावरून अभ्यासाच्या या क्षेत्रातील राजवाडयांच्या कर्तृत्वाची कल्पना येऊ शकेल.

राजवाडे यांच्या भाषाशास्त्रविषयक टिपणांचे व निबंधाचे पुढीलप्रमाणे गट पाडून त्यांचा विचार करता येईल.

### ( १ ) विशिष्ट भाषांची व्याकरणे

राजवाडयांचे लक्ष मुख्यतः संस्कृत व मराठी या दोन भाषांकडे होते. त्यामुळे त्यांची व्याकरणे त्यांनी लिहिली आहेत. पैकी त्यांनी केलेला ' संस्कृत भाषेचा उलगडा ' हे त्या भाषेचे पद्धतशीरपणे रचिलेले व्याकरण नसले तरी तो संस्कृतच्या व्याकरणावरील एक महत्त्वाचा निबंध आहे. तो लिहिण्यास आपल्या शालेय शिक्षणातील एक अनुभव ( द्विवचनविषयक ) कसा कारणीभूत झाला ते राजवाड्यांनी या निबंधाच्या प्रारंभी मनोरंजकपणे सांगितले आहे. नदीमुखाने समुद्रात प्रवेश करावा त्याप्रमाणे राजवाडे येथे द्विवचनाच्या चर्चेच्या निमित्ताने संस्कृत भाषेच्या सुबन्त व तिङन्त विचारात शिरत आहेत. हा विचार त्यांनी स्वतंत्रपणे केला असून संस्कृत व्याकरणातील घोकंपट्टीची जुनी परंपरा मोडून तिला बौद्धिक बैठक दिली आहे. ही

बैठक नवीन आहे. पाणिनीने केलेल्या भाषेच्या व्यवस्थापनास कार्यकारणशोधाची जोड देण्याचा प्रयत्न येथे आहे. तसेच विवेचनपद्धतीही काही प्रमाणात तरी ऐतिहासिक आहे. राजवाड्यांच्या या निबंधावर डॉ. पळसुले यांनी केलेली टीका[1] ध्यानात घेऊनही त्याचे महत्त्व मान्य करावेच लागते. राजवाड्यांच्या 'ज्ञानेश्वरीच्या व्याकरणा'वरही उलटसुलट चर्चा वरीच झाली. परंतु या व्याकरणाचे महत्त्व वादातीत आहे. मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण रचण्याचा हा पहिला प्रयत्न म्हटला पाहिजे. या व्याकरणाच्या प्रस्तावनेत राजवाडे म्हणतात, "ज्ञानेश्वरीचा हा पाठ व ही प्रत छापण्याचा मुख्य उद्देश भाषाशास्त्रीय आहे...प्रस्तुत व्याकरण ज्ञानेश्वरीचा व्याकरणशुद्ध अर्थ करण्याचे एक साधन होईल". हे व्याकरण (१) वर्णेतिहास, (२) आदेशेतिहास, (३) नामविभक्तिप्रत्ययेतिहास, (४) क्रियाविभक्तिप्रत्ययेतिहास, (५) निपातेतिहास अशा पाच प्रकरणांत विभागले असून त्यात राजवाड्यांनी पुढील महत्त्वाचे निष्कर्ष काढले आहेत :—

१. जसे आर्षभाषेला स्वर आहेत, तसें ज्ञानेश्वरीच्या भाषेला स्वर आहेत. ज्ञानेश्वरी स्वरात वाचीत...आर्षकालापासून आतापर्यंत उदात्त, अनुदात्त, स्वरित अशा स्वरांत बोलण्याची परंपरा आहे.

२. मराठीला अपभ्रष्ट भाषा म्हणण्याऐवजी 'सुलभोच्चारप्रवण' भाषा म्हणावे.

३. मराठीने दंत्यतालव्य व्यंजने नव्याने रूढ केली.

४. ज्ञानेश्वरीत 'ळ' कार नाही.

ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे हे व्याकरण राजवाड्यांनी पाणिनीय व्याकरणाच्या चौकटीत बसविण्याचा प्रयत्न केला असल्याचे आपण मागे पाहिलेच आहे. यामुळे काही ठिकाणी ते अवास्तव वाटते.

दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'च्या निमित्ताने राजवाड्यांनी लिहिलेले 'सुबन्तविचार' व 'तिङन्तविचार' हे दोन लेख म्हणजे एका दृष्टीने मराठी भाषेच्या व्याकरणातील दोन महत्त्वाची प्रकरणेच असल्याने त्यांचा निर्देश याच विभागात करणे योग्य होईल. या प्रकरणांना वरील नावे देण्यातही राजवाड्यांनी पाणिनीचे अनुकरण केले आहे. 'सुप्' व 'तिङ्' या दोन पारिभाषिक संज्ञा असून त्या पाणिनी अनुक्रमे नामांच्या सप्तमीच्या अनेकवचनी प्रत्ययांसाठी व निरनिराळे काळ आणि अर्थ यांचे वाचक प्रत्यय लागून विकार पावलेल्या धातूंसाठी वापरतो. त्यांवरून व पाणिनीच्याच आधारे राजवाड्यांनी मराठी भाषेच्या व्याकरणातील वरील दोन प्रकरणे सजविली आहेत.

### (२) काही विशिष्ट भाषिक अभ्यास

या विभागात मुख्यतः पुढील लेख व टिपणे येतात :—

१. श्रवणबेळगोळचा शके ९०५ चा शिलालेख.

२. 'मानसोल्लास' मधील मराठी पदे.

३. स्टेफेन्सचे 'ख्रिस्तपुराण'.

४. मराठीतील 'ल' प्रत्यय.

५. ज्ञानेश्वरीची प्रस्तावना.

वरीलपैकी श्रवणबेळगोळच्या शिलालेखावरील टिपणात राजवाड्यांनी त्या लेखातील प्रत्येक शब्दरूपाचे ऐतिहासिक विवेचन केले असून विशेषतः 'करवियले' या प्रयोजक भूतकृदन्ताची परंपरा अचूकपणे दाखवून दिली आहे. 'ख्रिस्तपुराणा' वरील लेखात मात्र त्यांची दृष्टी पूर्वग्रहदूषित असून त्यात या काव्याचे संपादक श्री. सालडाणा व त्याचे परिचयकर्ते श्री. राजारामशास्त्री भागवत यांच्यावरील कठोर टीकेशिवाय विशेष काही मिळत नाही. दृष्टी मात्र सूक्ष्म आहे. उदा०, स्टीफन्सच्या गद्य प्रस्तावनेतील 'पण सुध मराठी **मधिमा** लोकासी न कळे देखुनु हेआ पुराणाचा फळु बहुतां जनासी मुफळु होउंसी काये केलें' इ. वाक्यातील 'मधिमा' या शब्दाचे व्युत्पादन (< सं. मध्यम) व त्याचा अर्थ (= हीन प्रतीच्या) करून स्टीफन्सने ख्रिस्तपुराणाची रचना सामान्य किरिस्तावांसाठी, म्हणजे बाटये लोकांसाठी केली, असे राजवाड्यांनी सूचित केले आहे. तसेच या ग्रंथात जुनी शब्दरूपे आढळत असल्याने भाषाभ्यासासही त्याचे महत्त्व विशेष आहे ही गोष्ट त्यांनी मान्य केली आहे. पण इतके करून शेवटी त्यांनी अभिप्राय व्यक्त केला आहे तो असा, की 'स्टीफन्सची भाषा अशिष्ट व गावढळ असल्यामुळे त्याचे हे महाकाव्य होऊ शकत नाही.'.

"मराठीतील 'ल' प्रत्यय" हा निबंध व्याकरणकार रा. भि. जोशी यांना उत्तर म्हणून लिहिलेला असून त्यात

१. 'अनैतिहासिक पाणिनी व ऐतिहासिक राजवाडे' —(केसरी, ता. २६ नोव्हेंबर १९६१)

भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे, गुणविशेषणे ( उदा. 'पहिल'), क्रियाविशेषणे ( उदा. 'बाहेरील' ), नामे व भविष्य काळाची रूपे या सर्वांना लागणारा ' ल ' हा प्रत्यय स्वार्थी आहे, व त्याचे मूळ प्राकृतातील ' ल, इल्ल ' या प्रत्ययांत आहे अशा अर्थाचे विवेचन राजवाडे यांनी केले आहे व ते नवीन आहे.

परंतु वरील सर्व लहानमोठ्या टिपणांपेक्षा राजवाड्यांनी ज्ञानेश्वरीस लिहिलेली विस्तृत प्रस्तावना निःसंशय अधिक मोलाची आहे. त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्राचीनत्वासंबंधी मतभेद झाले. परंतु त्यांच्या या प्रस्तावनेचे महत्त्व वादातीत आहे. प्रारंभीच त्यांनी ' व्याकरणा ' ची जी व्याख्या केली आहे ती मूलगामी स्वरूपाची आहे. ते म्हणतात, " विवक्षित लोक विवक्षित भाषा विवक्षित स्थळी व विवक्षित काळी कोणत्या पद्धतीने बोलतात व लिहितात, हे ज्या नियमसरणीने, म्हणजे शास्त्राने स्पष्ट केलेले असते त्यास त्या भाषेचे तत्स्थलीन, तत्कालीन व तल्लोकीय व्याकरण म्हणतात " ( प्रस्ता०, पृ. १ ). याप्रमाणे व्याख्या करून मग मराठीच्या बोलींचे तौलनिक व्याकरण, आधुनिक सगोत्र भारतीय भाषांचे तौलनिक व्याकरण, भाषेतील शब्दांची व शब्द-रूपांची व्युत्पत्ती व निरुक्ती सांगणारे ऐतिहासिक व्याकरण, वगैरे व्याकरणांचे प्रकार त्यांनी दिले आहेत. ते देताना 'तौलनिक व्याकरण व ऐतिहासिक व्याकरण असा दिक्कालावछिन्न द्विधा भेद ' असल्याचे राजवाडे म्हणतात ते मात्र बरोबर नाही. कारण ऐतिहासिक व्याकरण झाले तरी ते तौलनिक पद्धतीनेच निर्माण होत असते. तसेच, मराठी भाषेचे जातीवरून पडलेले भेद सांगताना महानुभाव पंथीयांच्या ग्रंथांत अतिशूद्रांची भाषा दिसून येते असे ते म्हणतात तेही बरोबर नाही. 'मानभाव' या शब्दाचे मूळ ' मांगभाऊ ' या शब्दात कल्पिल्याने बहुधा त्यांच्या हातून वरील चूक झाली असावी. यासारखे काही अपवाद सोडल्यास राजवाड्यांच्या या प्रस्तावनेत अपसिद्धान्त असे फारसे नाहीत. उलट, " अपभ्रंश हा अवस्थान्तरांच्या वरचा तात्पुरता मल अथवा विकार आहे; तो भाषेच्या कोणत्याही अवस्थेत भास्मान होतो " यासारखे मौलिक सिद्धान्त त्यांच्या विवेचनात जागोजाग विखुरलेले आहेत. तसेच, पाली भाषेचे स्वरूप, अशिष्ट भाषेचा ' दुतोंडीपणा ', प्राकृत भाषांचा ऐतिहासिक क्रम यांसारख्या भाषाविषयक प्रश्नांवरील चर्चाही त्यांच्या विवेचनाच्या ओघात येऊन गेल्या आहेत. सारांश, ही ज्ञानेश्वरीची प्रस्तावना म्हणजे राजवाड्यांच्या बुद्धिमत्तेने व विद्वत्तेने गाठलेले एक शिखर असल्याप्रमाणे आहे.

## ( ३ ) शब्दकोशरचना

व्याकरणाच्या खालोखाल, किंबहुना बरोबरीने, राजवाड्यांना कोशरचना हा विषय प्रिय होता. त्यामुळे त्यांनी जन्मभर खपून मराठीचा धातुकोश व नामादिकोश यांची संपूर्ण तयारी करून ठेवली. दुर्दैवाने त्यांच्या हातून प्रत्यक्ष कोशरचना होऊ शकली नाही. ती त्यांच्या पश्चात धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंडळाने प्रो. कृ. पां. कुलकर्णी-कडून करवून घेतली. तरी पण या दोन्ही कोशांचा संपूर्ण मालमसाला राजवाड्यांनी स्वतः मेहनत घेऊन तयार करून ठेवला होता. त्यांची मूळ कल्पना सर्वसंग्राहक स्वरूपाचा ' राष्ट्रीय मराठी कोश ' रचण्याची होती. यांच्या पूर्वी युरोपिअन कोशकारांनी रचलेले कोश त्यांना मान्य नव्हते. कारण त्यांत ' कोश ' व ' व्याकरण ' त्यांच्या मर्यादा न जाणल्याने झालेले मर्यादा-तिक्रमण त्यांना दिसत होते. त्यांना कोश व व्याकरण असे सशास्त्र विभाग पाहिजे होते व त्याप्रमाणे मराठीच्या भावी कोशकारास त्यांनी काही सूचनाही केल्या आहेत.* पैकी एक अशी, की कोश ' सशास्त्र, स्वल्पाक्षर, असंदिग्ध व संपूर्ण असावा. ' मराठीचा धातु-कोश राजवाड्यांनी वरील आदर्श समोर ठेवून केल्याप्रमाणे वाटतो. या कामी त्यांनी अपार परिश्रम घेतले. धातूंच्या ३०,००० चिठ्या तयार केल्या, वर्गीकरणाचे तक्ते करून त्यांतील एकूण २७ सदरे भरण्याचा शक्य तो प्रयत्न केला. हेतू असा, की प्रत्येक धातूचा परिष्कार या २७ अंगांनी करावा. आता असा पूर्णपणे परिष्कृत धातू एकच निघाला ही गोष्ट निराळी. राजवाड्यांचा हेतू मात्र हा धातुकोश सर्व अंगांनी परिपूर्ण असावा हा होता व त्याप्रमाणे धातूंचे अनुबंध, त्यांचे ' ल ' कार व त्यांची निर्वचनबीजे त्यांनी जास्तीत जास्त देण्याचा प्रयत्न केला आहे. एकूण धातुसंख्या ३०,००० भरली तरी प्राथमिक व साधित धातू असा भेद केल्यास ती १६,००० च्या आसपास येईल. पण संस्कृतात तर धातू एकूण २२०० ! मग मराठी भाषेतील प्रत्येक शब्दाचे मूळ संस्कृतात शोधू पाहणाऱ्याचे कसे होईल ? साहजिकच पाणिनीय धातुपाठात अनेक कृत्रिम धातू आहेत या दृष्टिने यांच्या आक्षेपास उत्तर देणे

*संकीर्ण निबंध, भा. २ पृ. ८२–८३.

राजवाड्यांना भाग पडले व ते त्यांनी पंतजलीचे पुढील मत उद्धृत करून दिलेही आहे.

"सर्वे खलु अपि एते शब्दाः देशान्तरेषु प्रयुज्यन्ते। नच एव उपलभ्यन्ते। 'उपलब्धौ यत्नः क्रियताम्। महान् शब्दस्य प्रयोगविषयः सप्तद्वीपा वसुमती त्रयो लोकाः ॥"

परंतु बाबावाक्यांचा आधार देऊन पक्ष सिद्ध होत नसतो. तेव्हा राजवाड्यांच्या या कोशात 'हठात् निर्वचना'चा प्रकार आहे हे कबूल केले पाहिजे. तरीसुद्धा यच्चयावत मराठी धातूंची यादी म्हणून त्यास महत्त्व आहेच. 'धातू' हा शब्द सं. धाङ् या धातूपासून सिद्ध होत असून 'अमरकोशा'त त्याची 'शब्दयोनि' अशी सार्थ व्याख्या केली आहे. तिच्यातील अभिप्राय ध्यानात घेतल्यावर राजवाड्यांच्या या धातुकोशाचे मराठीच्या व्युत्पत्तिकोशास असलेले महत्त्व कळून येईल. या कोशाबरोबरच त्यांची नामादि-कोशाचीही तयारी चालू होती. त्याची विभागणी त्यांना १ सर्वसामान्य नामे, २. व्यक्तिनामे, ३. उपनामे, ४. जातिनामे, व ५. स्थलनामे अशा पाच प्रकरणांत अभिप्रेत होती असे वाटते. पैकी व्यक्तिनामे व स्थलनामे या दोन विषयांवरील त्यांचे विचार आपण पुढे स्वतंत्रपणे पाहूच. महाराष्ट्रातील उपनामांचा विचार राजवाड्यांनी गोत्रदृष्ट्या केला असून ती थेट सप्तर्षीपर्यंत नेऊन भिडवली आहेत. "भारतीय आर्यांचा वंश महाराष्ट्रात विनतूट व अस्खलित चालत आला आहे' हा त्यांचा एतत्प्रकरणीचा सिद्धान्त विवाद्य असला तरी तो ज्या व्युत्पत्तीच्या आधारावर त्यांनी मांडला आहे ती विचारात घेण्याजोगी आहे.

### (४) व्यक्तिनामे व स्थलनामे

हे दोन्ही विषय राजवाड्यांच्या 'नामादिव्युत्पत्तिकोशा'त समाविष्ट असल्याचे आपण पाहिलेच आहे. पैकी व्यक्तिनामांचा विचार त्यांनी जातिभेद, लिंगभेद व भाषाभेद[1] या तीन दृष्टिकोणांतून केला असून इ. १२९० ते १६५६ पर्यंतच्या काळातील ग्रंथांतून व इतर साधनांतून आढळणाऱ्या व्यक्तिनामांची सिद्धी करण्याचा प्रयत्न केला आहे, या दृष्टीने त्यांनी 'ऐतिहासिक प्रस्तावनां' च्या ८ व्या खंडात केलेले विवेचन उल्लेखनीय आहे. स्थलनामे व त्यांचा इतिहास हाही राजवाड्यांच्या अभ्यासाचा एक विषय होता व त्याची त्यांनी केलेली मीमांसा 'महाराष्ट्राच्या वसाहतकालीन इतिहासाचा शोध' या निबंधावरून कळून येईल. त्यात त्यांनी ग्रामनामांच्या निरुक्तीचे काही आडाखे बसविले आहेत. उदा., मराठी ग्रामनामांच्या अंती 'ण' असल्यास सं. 'वन' पासून, 'डी' असल्यास सं. 'वाटिका' पासून, 'द्रें' असल्यास सं. 'पद्र' पासून, इत्यादी. तसेच निरनिराळ्या ग्रामनामांची मुळे भिन्न वनस्पती, प्राणी, भूप्रदेश इत्यादी सृष्ट पदार्थांत शोधण्यातही त्यांच्या अवलोकनाची व्यापकता दिसून येते. 'महिकावतीच्या बखरी' स लिहिलेल्या प्रस्तावनेतही त्यांनी ग्रामनामांचा विचार केला असून तेथे त्यांनी कोकणपट्टीतील सुमारे ४०० ग्रामनामांची चर्चा केली आहे. या बाबतीत त्यांची निरुक्ती कित्येक ठिकाणी कृत्रिम वाटते हे मात्र कबूल केले पाहिजे. उदा०, काही ग्रामनामांच्या अन्ती असणारा 'नेर' हा शब्द सरळपणे सं. नगरपासून सिद्ध होत असतांना राजवाड्यांनी तो सं. नीवर (= वसती करण्यास योग्य प्रदेश) पासून व्युत्पादिण्याचा व्यर्थ प्रयत्न केला आहे. तसेच 'पुणे' हे ग्रामनाम ते सं. पूर्णक (=स्वर्णचूड पक्षी) पासून सिद्ध करू पाहतात तेही पटत नाही. याहीपेक्षा वऱ्हाड, कऱ्हाड आणि मऱ्हाट या तीन देशवाचक नामांची अनुक्रमे वहरट्ट (= पलीकडील), कहरट्ट (= अलीकडील), व महरट्ट (मध्य) अशी मुळे शोधण्यात व त्यांचे वरीलप्रमाणे अर्थ करण्यात स्वैर कल्पनाच अधिक वाटते. एकंदरीतच राजवाड्यांचे व्युत्पादन सत्यापेक्षा कल्पनेवर अधिक आधारलेले आहे. व्यक्ति-स्थल-नामांच्या बाबतीत तर हे फारच खरे आहे.

### (५) पाठचिकित्सा (Textual Criticism)

प्राचीन ग्रंथांची पाठचिकित्सा करून त्यांच्या अनेक हस्तलिखितांच्या आधारे त्यांच्या प्रमाण प्रती संपादित करणे हेही एका दृष्टीने भाषाशास्त्राचेच एक अंग असून त्याची जाणीव राजवाड्यांना होती. या दृष्टीने त्यांनी संशोधिलेली ज्ञानेश्वरीची बीड-प्रत, तिची कुंटे-प्रतीशी केलेली तुलना, व 'पर्शरामोपदेश' या इ. स. १३५६ मधील संस्कृत ग्रंथाच्या अखेरचा मराठी भाग आणि इ. स. १३९५ चा मठगाव शिलालेख यांतील भाषेशी दाखविलेले त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या भाषेचे साम्य, हा राजवाड्यांचा उद्योग उल्लेखनीय आहे. ज्ञानेश्वरीच्या मूळ प्रतीवर एकनाथांनी संस्करण करून 'प्रती शुद्ध केली' म्हणजे नेमके काय केले याचाही त्यांनी अंदाज घेतला आहे. याचा अर्थ त्यांना आज प्रगल्भदशेस

१. उदा. सं. नारायण; महाराष्ट्री : कान्हो; देशी : दगडू; फारसी : फिरंगोजी.

येऊन पोचलेल्या व डॉ. सुखठणकरांसारख्या संशोधकांनी पूर्णतेस आणलेल्या पाठचिकित्साशास्त्राची संपूर्ण कल्पना होती असा मात्र नव्हे. किंबहुना, त्या बाबतीत त्यांचे अज्ञानच अधिक होते, असे त्यांची Variorum Edition ची कल्पना पाहून वाटते. परंतु या बाबतीत राजवाड्यांना दोष देता येणार नाही. कारण त्यांनी ज्ञानेश्वरीचे व महिकावतीच्या बखरीचे संशोधन-संपादन केले त्या वेळी हे शास्त्र निदान भारतात तरी अतिशय अप्रगल्भ दशेत होते. किंबहुना महाराष्ट्रात तरी माडगावकरांच्या नंतर राजवाड्यांनीच त्याला चालना दिली असे म्हटले पाहिजे.

### ( ६ ) मराठीची लिपी

या विषयाचा विचार राजवाड्यांनी ८ व्या खंडाच्या प्रस्तावनेत केला असून त्यात लेखनसाधनांचे व लिपीचे मूळ शोधण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. पैकी साधनांविषयी ते म्हणतात, की ज्ञानेश्वरीच्या पूर्वी भूर्जपत्रे, ताडपत्रे व ताम्रपत्रे हे लेखनसाहित्य होते. त्यांच्या मते कागद हे साधन मुसलमानांकडून ज्ञानेश्वरांच्या काळात आले. याला पुरावा त्यांनी खुद्द ज्ञानेश्वरीतून दिला आहे.[१] ज्ञानेश्वरीत 'कागद' हा शब्द नसला तरी त्या अर्थाने येणारा 'पाट' हा शब्द आहे.[२] अर्थात त्या वेळी कागद हळूहळू प्रचारात येत होता असे राजवाड्यांचे म्हणणे आहे. तसेच मोडी लिपीही ज्ञानेश्वरीच्या पूर्वीपासून अस्तित्वात आहे असे त्यांचे मत आहे. ( उदा०, 'सुखाची लिपी', ज्ञा. ३. २४६; 'वोळी लेहे वेगवंतु। आपणचि', ज्ञा. १३. ३०७ ) मात्र मोडीचे मूळ ते फारसीत शोधू पाहतात याचे नवल वाटते. फारसीत 'नस्ख' ( = बाळबोध, सरळ ) व 'शिकस्ता' ( = मोडी ) अशा दोन लेखनपद्धती असून त्यांपैकी दुसरीपासून मोडी लिपी निघाली असे त्यांचे म्हणणे आहे. 'मोडी ज्ञानेश्वरापूर्वीपासून आहे' व ती 'फारसीच्या एका लेखनपद्धतीपासून निघाली' या त्यांच्या दोन विधानांतील विरोध उघड आहे.

### ( ७ ) मराठीची लेखनपद्धती

मराठीच्या लेखनपद्धतीचा विचार राजवाड्यांनी ८ व्या खंडात केला असून त्यात जुन्या व नव्या विरामचिन्हांचा विचार प्रामुख्याने आला आहे. जुन्या मराठीत एकूण सात विरामचिन्हे आहेत, ती अशी—

! ∧, ‖, :, =, (    );

नवीन विरामचिन्हयुक्त लेखनपद्धती इंग्रजीतून आली व त्यामुळे काही घोटाळे निर्माण झाले असे राजवाड्यांना वाटते. उदाहरणार्थ, भरीव टिंब किंवा बिंदू ( . ) सध्याच्या मराठी लेखनात पूर्णविराम व संक्षेप अशा दोन्ही कार्यांसाठी योजिला जातो ( उदा०, १. मी जातो. २ सा. न. वि. वि. ). बिंदूच्या उपयोगातील हे द्वैत व त्यातून निर्माण होणारी संदिग्धता टाळण्यासाठी मराठीत जुनी दुरेघी संक्षेपपद्धती ( उदा०, वि॥ = विनंती विशेष; सो॥ = साहेब ) पुन्हा रूढ करावी अशी राजवाड्यांची सूचना आहे. तसेच प्रश्नचिन्हातील ( ? ) तळचा बिंदू त्यांना अनावश्यक वाटतो. शिवाय त्यांच्या मते तो कधी पूर्णविरामाचे तर कधी अल्पविरामाचे काम करतो ( उदा०, पूर्णविरामद्योतक : How do you do ? अल्पविरामद्योतक : Where did you go? what did you speak? How did you behave ? were some of the questions your father asked. ). म्हणून प्रश्नचिन्हातील वरचे निठवेच मुख्य असल्याने राजवाडे चार निरनिराळ्या प्रकारची प्रश्नचिन्हे रूढ करावी असे सुचवितात. ती अशी :— स्वल्पप्रश्न, अर्धप्रश्न, पूर्णप्रश्न व प्रश्न. याच अर्थाने विचार त्यांनी उद्गारचिन्हांबाबतही व्यक्त केला आहे. तसेच ऐतिहासिक लेख व प्राचीन काव्यग्रंथ छापताना येणाऱ्या अडचणी ध्यानात घेऊन राजवाड्यांनी त्यांच्या निवारणार्थ काही नवीन विरामचिन्हे सुचविली आहेत.

### ( ८ ) मराठीवरील इतर भाषांचा परिणाम

मराठी भाषेच्या इतिहासात तिच्यावर इतर भाषांचा झालेला परिणाम हाही राजवाड्यांच्या अभ्यासाचा एक विषय होता. त्यातही त्यांचे लक्ष विशेषेकरून फारसीच्या झालेल्या परिणामाकडे होते. कारण तो परिणाम त्यांच्या ध्यानात ऐतिहासिक कागदपत्रांचे व बखरींचे वाचन करताना अधिक प्रमाणात आला. त्याचा इतिहास त्यांनी सांगितला असून १७ व्या शतकातील मराठी भाषेत असलेले फारसी शब्दांचे प्रमाण पुढे झपाट्याने कमी होत शाहूच्या राजवटीत, म्हणजे इ. स. १७२८ मध्ये ते किती घटले याची कारणमीमांसाही त्यांनी केली आहे. मराठीवर फारसीचा प्रत्यक्ष परिणाम शब्दसंग्रह, वाक्प्रचार, प्रत्यय, उच्चार, शब्दसिद्धी व विशेषनामे या पाच क्षेत्रांत कसा कमीअधिक

---

१. 'दोषांची लिहिली फाडी' ( ज्ञा. ४. ५२ )
'अक्षरें पुसिलेयां न पुसे। अर्धुं जैसा॥' ( ज्ञा. ८.१७४ )
२. 'पाटेयावरिलें आखरें। जैसी पुसतां येति करें॥" ( ज्ञा. १८.१०९९ )

प्रमाणात झालेला दिसतो ते उदाहरणांसह सांगून राजवाड्यांनी या भाषिक संपर्काविषयी काहीं निष्कर्षही काढले आहेत. ते असे—

१. परराज्याखाली भाषेची दैना कशी होते याचे फारसी-मराठी संबंध हे उत्कृष्ट उदाहरण आहे. या बाबतीत अँग्लो-सॅक्सन भाषेवर नॉर्मन लोकांच्या फ्रेंच भाषेचा झालेला परिणाम तुलनेसाठी उल्लेखनीय आहे.

२. मराठ्यांनी १७ व्या शतकात राज्यक्रान्ती केली म्हणून मराठीचे फारसीकरण थांबले. नाहीपेक्षा हिंदीप्रमाणे मराठीचीही उर्दू झाली असती.

३. मराठीने व मराठ्यांनी मुसलमानी राजसत्तेस विरोध करून हिंदी, पंजाबी इत्यादी भाषांनाही जीवदान दिले.

४. मराठीचे फारसीकरण पुढील कारणांनी टळले :— (१) मराठ्यांनी केलेली राज्यक्रांती; (२) मराठीने फारसीवर ठेवलेली आपली छाप; उदा०, बीतपसीलु, कारकूनु, इ. मराठी वळणाची 'उ' कारयुक्त रूपे पहावी; (३) फारसी नामांना मराठी लिंगसंस्कार—; उदा०, बाग (फा. नपुं.), पायपोस (फा. नपुं.); (४) फारसी शब्दांचे मराठीकरण; (५) देवनागरी लिपीचा वापर; (६) देशस्थ ब्राह्मण कारकुनांची हेमाडपंती पद्धती; (७) दासोपंत, एकनाथ यांसारखे साधू ग्रंथकार; (८) गोंधळी, वासुदेव, भाट, शाहीर यांसारखे लोककवी.

मराठी—फारसी संबंधाचा प्रश्न राजवाड्यांनी एकंदरीत खोलवर जाऊन चर्चिलेला दिसतो. त्यांच्या विवेचनातील एकदोन गोष्टी मात्र खटकतात. पैकी एक म्हणजे मराठीतील नामांच्या द्वितीयेच्या 'ला' या प्रत्ययाचे त्यांनी फारसीतील 'रा' या प्रत्ययापासून केलेले व्युत्पादन. या संबंधात बीम्सच्या मताचे (ला < लागी, लागौनि) खंडन करतांना ते म्हणतात, "कोणत्याही शब्दयोगी अव्ययाला विभक्तिप्रत्ययाचे रूप येण्याला ते शब्दयोगी अव्यय वापरातून हळू हळू कमी व्हावे लागते. 'लागी' चे तसे झालेले नाही. ते वापरात परवापर्यंत होते." या बाबतीत इतकेच म्हणता येईल, की राजवाड्यांचा वरील सिद्धान्त निरपवाद नाही. शिवाय 'ला' हा प्रत्यय मराठीचा फारसी भाषेशी संबंध येण्यापूर्वीपासून तिच्यात रूढ आहे. परंतु या व्युत्पादनाविषयी राजवाडे यांनी फार आग्रह धरलेला दिसतो.

याप्रमाणे राजवाडे यांनी केलेल्या भाषा व भाषाशास्त्रविषयक अभ्यासाचा धावता आढावा आहे. त्यांची भाषेच्या अभ्यासाची क्षेत्रे विविध होती व त्यांपैकी प्रत्येक क्षेत्रात त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे. ती लक्षात घेऊन त्यांच्या कार्याचे गुणदोषमापन पुढीलप्रमाणे करता येईल:—

### गुणविशेष

(१) राजवाडे यांच्या ठिकाणी भाषा व भाषाशास्त्र या विषयांसंबंधी मूर्तिमंत आस्था व तळमळ होती. या विषयाचा अभ्यास त्यांनी केवळ जिज्ञासूच्या वृत्तीने केला.

(२) तो करताना त्यांची वृत्ती स्पष्ट, परखड व निर्भीड होती. या दृष्टीने त्यांनी केलेली दादोबा वगैरे वैयाकरणांवरील टीका उल्लेखनीय आहे.

(३) राजवाडे यांच्या अवलोकनात व विवेचनात सूक्ष्मता आहे. याचे नमुन्यादाखल एकच उदाहरण देतो. 'अक्षरा' ची व्याख्या व्याकरणकार दामले यांनी पुढीलप्रमाणे केली होती :— "कोणत्याही स्वरास किंवा स्वरयुक्त व्यंजनास अक्षर म्हणतात." ही व्याख्या राजवाडे पुढीलप्रमाणे दुरुस्त करतात :—"स्वर किंवा व्यंजन यांच्या लेखी खुणेस अक्षर म्हणतात." या दृष्टीने 'शास्त्रीय भाषेत धरसोड उपयोगाची नाही' हे त्यांचे विधान उल्लेखनीय आहे.

(४) त्यांची दृष्टी व्यापक असून भाषाभ्यास हे समाजाभ्यासाचे एक अंग आहे याची जाणीव त्यांच्या ठिकाणी सतत आहे.

(५) डॉ. भांडारकरांच्या नंतर ऐतिहासिक पद्धतीने भाषेचा अभ्यास करणारे राजवाडे हे पहिले अभ्यासक होत. ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण रचताना त्यांनी ही पद्धती यशस्वीपणे योजून दाखविली.

(६) राजवाडे यांच्या ठिकाणी केवळ पांडित्य नसून त्याला प्रतिभाशक्तीची जोड होती. ती त्यांच्या काही व्युत्पादनात दिसून येते. उदा० 'मुंबई ते पुणे', किंवा 'एक ते पाच' यासारख्या शब्दप्रयोगांतील 'ते' या उभयान्वयी अव्ययाची त्यांनी दाखवून दिलेली फारसीतील परंपरा (फा. 'ता'=पर्यंत) पाहावी ('ऐतिहासिक प्रस्तावना,' खं. ८, पृ. ४०४). तसेच, 'दर दिवशी,' किंवा 'पुण्यापासून तो मिरजेपर्यंत' या रूढ मराठी वाक्प्रचारांतील द्विरुक्तीही त्यांनी मार्मिकपणे दाखवून दिली आहे.

( ७ ) सर्वांत मुख्य म्हणजे भाषाशास्त्र हे एक शास्त्र आहे या गोष्टीची जाणीव राजवाडे यांना सतत आहे. डॉ. भांडारकरांच्या नंतर शास्त्रकार म्हणून त्यांचेच नाव घेता येईल.

( ८ ) राजवाडे हे प्रयोग करणारे अभ्यासक होते. व्युत्पत्ती हे त्यांच्या अभ्यासाचे मुख्य क्षेत्र असून त्यात त्यांनी अनेक प्रयोग केले.

### दोषविशेष

( १ ) राजवाडे यांची दृष्टी पूर्वग्रहदूषित आहे. स्वतःला शास्त्रकार म्हणविणारास हे शोभत नाही. विशेषतः बीम्स, होर्न्ले, ग्रियरसन यांसारख्या युरोपियन अभ्यासकांवर त्यांनी केलेली टीका अश्लाघ्यच म्हटली पाहिजे. मतभेद व्यक्त करणे म्हणजे वैयक्तिक टीका किंवा कुचाळी करणे नव्हे, या गोष्टीची जाणीव राजवाड्यांना नाही.

( २ ) तसेच त्यांच्या ठिकाणी व्यक्तिपूजाही अतिरिक्त प्रमाणात आहे. ती त्यांच्या पाणिनिविषयक भक्तीतून व्यक्त होते. Imitation is the best type of flattery या तत्त्वाचे उत्कृष्ट उदाहरण त्यांच्या कृतीत दिसून येते. कारण त्यांनी आपला अभ्यास सर्वस्वी पाणिनीचे अनुकरण करून केल्याप्रमाणे वाटतो.

( ३ ) कल्पनेचा अतिरेक हेही राजवाडे यांच्या अभ्यासातील एक वैगुण्यच म्हटले पाहिजे. चिकुडर्याच्या ताम्रपटाच्या आधारे ते ज्या रीतीने मराठी भाषेचा जन्मकाळ पाचव्या शतकापर्यंत मागे नेऊ पाहतात, ती पाहता त्यांच्या अतिरिक्त कल्पनाविलासाचा चांगलाच प्रत्यय येतो. स्वैर कल्पना ही अभ्यासयुक्त संशोधनास मारक ठरते याची जाणीव त्यांना असावी तितकी नाही. पण यालाच त्यांचे काही भक्त ‘ brilliant hypothesis ’ या शब्दांनी गौरवितात याचे आश्चर्य वाटते.

( ४ ) राजवाडे हे मराठीचे व महाराष्ट्राचे पक्षपाती आहेत. याचे एक गमतीचे उदाहरण देतो. इंग्रजीच्या लेखनात कॅपिटल अक्षरे वरचेवर येतात व त्याबद्दल कोणी तक्रारही करीत नाही. राजवाड्यांना मात्र त्यामुळे इंग्रजी मजकूर ‘ डागळलेला ’ वाटतो व मराठीच्या लेखनात कॅपिटल अक्षरे नसल्यामुळे त्यांना ते लेखन ‘सुबक’ वाटते!

( ५ ) हठात् व्युत्पादन व निर्वचन हाही राजवाड्यांच्या अभ्यासातील एक दोष आहे. पैकी हठात् व्युत्पादनाचे उदाहरण म्हणून त्यांनी निरनिराळ्या ठिकाणी सुचविलेल्या ‘ विठ्ठल ’ या दैवतनामाच्या विविध व्युत्पत्तींकडे बोट दाखविता येईल. हठात् निर्वचनाचे उदाहरण ‘ ओं नमो जी आद्या ’ या ज्ञानेश्वरीच्या पहिल्याच ओवीतील ‘ ओं नमो ’ या पदाचे जे निर्वचन त्यांनी केले आहे त्यात मिळते. येथे वास्तविक ‘ नमो ’ हे सं. नमस्-नमः याचे सरळ संधिरूप आहे. परंतु त्याऐवजी राजवाडे त्या रूपाची परंपरा सं. नमत ( आज्ञार्थे द्वि. पु. अ. व. ) या रूपापर्यंत नेऊन त्याचा अर्थ ‘ नमस्कार करा ’ असा करतात. हे मुद्दाम आडवळणात शिरणे आहे असेच कोणीही म्हणेल.

वरील समारोप राजवाड्यांच्या पद्धतीने केला आहे. अर्थात् गुणदोषांची संख्या किंवा त्यांचे परस्पराशी प्रमाण ही कोणाच्याही कर्तृवाची किंवा यशापयशाची गमके होऊं शकत नाहीत. कारण एक गुण अनेक दोषांवर मात करू शकतो, किंवा एक दोष अनेक गुणांची माती करू शकतो. तेव्हा राजवाडे–पद्धतीने गुणदोषविवेचन करून झाल्यावर शेवटी त्यांच्या कर्तृत्वाचे मोजमाप साकल्यानेच केले पाहिजे. तसे केल्यास दोन गोष्टी स्पष्ट होतात. एक म्हणजे म्हणजे राजवाड्यांचे कर्तृत्व मोठे असले तरी त्याला त्यांच्या प्रकृतिधर्माच्या व परिस्थितीच्या मर्यादा पडलेल्या आहेत. त्यामुळेच जन्मभर व्याकरणशास्त्राचे चिंतन करूनही ते येस्पर्सनप्रमाणे Philosophy of Grammar निर्माण करू शकले नाहीत. दुसरे म्हणजे ते उच्च प्रतीचे भाषासंशोधक आहेत; भाषाशास्त्रज्ञही आहेत किंवा काय ते सांगणे कठीण आहे.

### राजवाडे यांचे भाषाशास्त्रविषयक लेख.

१. ऐतिहासिक प्रस्तावना, खंड ६ व ८.
२. संकीर्ण लेखसंग्रह ( ‘ ग्रंथमाला ’ मासिकातील ).
३. राजवाडे-लेखसंग्रह, भाग २–३.
४. संस्कृत भाषेचा उलगडा.
५. ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण.
६. सुबन्तविचार.
७. तिङन्तविचार.
८. नामादि व्युत्पत्तिकोश (संपादक : कृ. पां. कुलकर्णी).
९. मराठी धातुकोश ( संपादक : कृ. पां. कुलकर्णी ).
१० ज्ञानेश्वरीची प्रस्तावना,
११ महिकावतीची बखर ( प्रस्तावना ).

( याशिवाय राजवाड्यांनी शेकडो मराठी शब्दांची व्युत्पत्ती मुख्यतः भा. इ. सं. मंडळाच्या वार्षिकातून व त्रैमासिकातून दिलेली आहे. )

# तुकारामकृत गीतानुवाद

● भा. पं. बहिरट ●

१ संतवाङ्मयाच्या अभ्यासासाठी ज्या संतांच्या नावावर ते वाङ्मय प्रसिद्ध आहे त्या संतांचेच ते अधिकृत लिखाण आहे काय याचा निर्णय करणे अतिशय महत्त्वाचे असते. ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम इत्यादी संतांचे नावावर अभंग, ओवीबद्ध प्रकरणे, आख्याने इत्यादी प्रसिद्ध झालेली आहेत. परंतु याच नावांचे अनेक कवी होऊन गेल्याने आद्यकवीचे लिखाण कोणते आहे याचे संशोधन करणे जरूर पडते. देहूकर तुकोबांचे नावावर स्फुट अभंगांबरोबरच भगवद्गीतेचा अभंगानुवाद प्रसिद्ध झाला आहे. हा अभंगानुवाद देहूकर तुकोबांचा की अन्य तुकारामाचा आहे याचा निर्णय होणे आवश्यक आहे.

२ गीतानुवाद निरनिराळ्या वेळी छापून प्रसिद्ध झाला. इ. स. १८४२ त गणपत कृष्णाजीचे छापखान्यात छापलेली ' गीतार्थबोधिनी ' प्रसिद्ध झाली. त्यात वामनपंडिताची समश्लोकी, मोरोपंती आर्या, मुक्तेश्वराची ओवी, तुलसीदासकृत दोहरा व त्याजबरोबर तुकारामकृत अभंग देण्यात आले. सन १८८९ त तुकाराम तात्यांनी अभंगांची ( ? ) तुकोबांची गाथा दोन भागात प्रसिद्ध केली. त्यात हा अभंगानुवाद छापला. त्याच्यामागून दामोदर सावळाराम, चापेकर देसाई मंडळीनी अनुक्रमे भगवद्गीतेच्या प्राकृत टीकेत व गीतेत तो छापला. बेळगावचे श्री. रामचंद्र स्वामीराव नाइक यांनी भगवद्गीतेवर उपलब्ध सर्व मराठी टीका छापण्याची योजना काढली. तीत ज्ञानदेवकृत भावार्थदीपिका, माधवनारायणदासकृत नारायणकीर्ति, रंगनाथ मोगरेकरकृत चित्सदानंद लहरी, रमावल्लभदासकृत चमत्कारी, दासोपंतकृत गीतार्णव, त्यांचीच गीतार्थबोधचंद्रिका, वामनाची यथार्थदीपिका, अच्युताश्रमकृत बालबोधिनी, रत्नाकराची रत्नाकरी, हरिपंडितकृत गीतार्थप्रकाश, वामनकृत समश्लोकी, मोरोपंतांची आर्याटीका, याखेरीज सोपानदेव निवृत्तिदेव यांच्या टीका देऊन तुकाराम ( पांडुरंगदास ) याचे अभंगही छापले आहेत. ही योजना महत्त्वाची होती व कामास आरंभ होऊन पुस्तकाचा पहिला भागही सन १९३१ त प्रसिद्ध झाला. परंतु दुर्दैवाने पुढील भाग प्रसिद्ध न होता पहिल्या अध्यायाच्या ४७ व्या श्लोकानंतरचे काम बंद पडले. तुकारामकृत गीतानुवादाचे स्वतंत्र पुस्तक छापले गेले नव्हते. ते श्री. वा. सी. बेंद्रे यांनी १९५० साली " मंत्रगीता " या नावाने प्रसिद्ध केले. श्री. बेंद्रे यांनी त्यास विस्तृत प्रस्तावना जोडून तीन हा अभंगानुवाद देहूकर तुकारामाचाच होय असे अनेक कल्पना लढवून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो सफल झालेला नाही.

३ कोणत्याही गोष्टीचा विचार करताना परंपरा विचारात घ्यावी लागते. परंपरेत काही अवांतर गोष्टी आढळल्या तरी तारतम्याने मूळ परंपरेचे महत्त्व डावलता येत नाही. तुकोबांनी ( देहूकर ) गीतानुवाद अभंग रचले असते तर कोठल्या तरी वारकरी परंपरेत ते म्हटले गेले असते. परंतु तसे ते कोठेही आढळत नाहीत. स्फुट अभंग राहोत पण गीतेसारख्या महत्त्वाच्या ग्रंथावरील अभंग रचना ही जर देहूकर तुकोबांची असती तर तिचा पाठ कोठे ना कोठे आढळलाच असता. परंपरेस प्रमाणभूत अशा देवडीकराचे गाण्यात, पंडितांच्या आवृत्तीत व इतरही प्रमुख प्रतीत हे अभंग नाहीत. जुन्या बाडांतूनही संताजीच्या वह्या, देहूची वही इत्यादीतूनही हे नाहीत. श्री. बेंद्रे यांना उपलब्ध झालेली गीतानुवादाची सर्व बाडे उत्तर पेशव्यांचे कालीन आहेत असे त्यांनीच सांगितले आहे. रामदासी बाडे धुळ्यास समर्थ वाग्देवता मंदिरात आहेत. त्यात बाड नं. १६०५ मध्ये गीतानुवादाची हस्तलिखित प्रत आहे. " श्रीसांबाय नमः " " श्रीअवधूत दत्तात्रय " इत्यादी अक्षरांवरून वारकरी संप्रदायाशी न जमणारी आहे. बाड नं. ११ त फक्त बारावा अध्याय व बाड नं. १७१४ त आणखी एक प्रत आहे. सर्व प्रती अलीकडच्याच आहेत.

४ गीतानुवादाचा उल्लेख तुकोबांचे समकालीन व नंतरचेही जिव्हाळ्याचे अनुयायी व नातलग करीत नाहीत. रामेश्वरभटजी तुकोबांचे जिव्हाळ्याचे शिष्य–

"संतप्रहमेळी जगदंध्या गिळी । पैल उदयाचळी भानु तुका ।"
" जपतप यज्ञ लाजविली दाने । हरिनाम कीर्तने करूनिया ॥"

असे उद्गार मोठ्या प्रेमादराने काढणारे रामेश्वर, " माझ्या सद्गुरूचे अवलोकिता मुख । समाधीचे सुख तुच्छ वाटे "

अनुक्रमणिका

असे आपल्या सद्गुरूविषयी नितांत प्रीतीचे बोल बोलणारे निळोबा गीतानुवादाचा उल्लेख त्यांच्या लिखाणात कोठे करीत नाहीत. बहिणाबाईच्या एका अभंगात " मंत्रगीता " शब्द आला आहे. त्यावरून श्री. बेंद्रे हे तुकोबांनी आपला प्रसाद म्हणून आपण लिहिलेल्या गीतानुवादाची प्रत बहिणाबाईंना दिली असा अर्थ करतात. परंतु अभंगाचा संदर्भ पाहता ' मंत्रगीता ' एक शब्द नसून मंत्रगीता म्हणजे मंत्र आणि गीता असा अर्थ आहे. " ठेवोनिया कर मस्तकी बोलिला। मंत्र सांगितला कर्णरंधी ॥ म्याही पायावरी ठेविले मस्तक। दिधले पुस्तक मंत्रगीता " ॥ याचा सारांश तुकोबांनी मंत्र दिला व गीतेचे पुस्तक दिले. गीतेचे पुस्तक म्हणजे गीतानुवाद नव्हे. तुकोबांनी गीतेबद्दल गौरवाचे शब्द काढले म्हणजे त्यावरून त्यांनी अनुवाद केला असला पाहिजे असे नव्हे. " महाराष्ट्री शब्दात वेदांताचा अर्थ। बोलिला लोकांत सर्वद्रष्टा" असे तुकोबाचे वर्णन बहिणाबाई करते याचा अर्थ वेदान्ताची तत्त्वे तुकोबांनी मराठीत विशद केली असा सामान्यपणे होतो. त्यांनी गीतानुवादच केला असा होत नाही. रामेश्वर भटही " चहू वेदांचे हे केले विवरण। अर्थही गहन करूनिया ॥ " म्हणतात याचा अर्थ वेदांवर त्यांनी अभंग रचले असा केल्यास वस्तुस्थितीचा विपर्यास होईल. वेदाच्या सारभूत गोष्टी अभंगात सांगितल्या असाच अर्थ करावा लागतो. याच दृष्टीने खुद्द तुकोबांनी "वेदाचा तो अर्थ आम्हासीचि ठावा। येरांनी वहावा भार माथा ॥" किंवा " वेद अनंत बोलिला। अर्थ इतुकाची साधिला ॥ विठोबासी शरण जावे। निजनिष्ठा नाम गावे ॥ " असे म्हटले आहे. वामनांनी तुकोबाचे वर्णन " जयाचे मुखी भारती वेदमाता। " असे केले त्याचा अर्थ वरीलप्रमाणे आहे. रा. बेंद्रे म्हणतात त्याप्रमाणे तुकोबांनी गीता मुखोद्गत केली होती असा नव्हे. तुकोबांच्या समकालीनाप्रमाणेच त्यांचे नंतर होऊन गेलेले चरित्रकार महिपती, पणतू पांडुरंगबुवा व गोपाळबुवा हेही गीतानुवादाचा उल्लेख करीत नाहीत.

५ तुकोबाच्या अभंगाच्या वह्या डोहांत बुडविल्याच्या प्रसंगास रा. बेंद्रे यांनी निराळेच रूप दिले आहे. या वह्या म्हणजे गीतानुवादाच्याच अशी त्यांनी कल्पना केली आहे; व धर्मशास्त्रांत एक जलदिव्याचा प्रकार असतो तोच हा होता असे विधान करून त्यास " वैश्यश्च सलिलं प्रोक्तम् " असा पुरावा दिला आहे! गागाभट्टास आणून त्यांनी हे प्रायश्चित त्यांच्या 'व्यवहार निर्णया'नुसार झाले असले पाहिजे. ते चिंचवडकर व चाकणकर वेदान्त्यांच्या आग्रहानुसार होऊन या दिव्याचे वेळी अध्यक्ष म्हणून चिंचवडकर देव असले पाहिजेत, असे काल्पनिक चित्र रंगविले आहे. मुळात हा प्रसंग साधा असून केवळ मंत्रगीता देहूकर तुकोबाची आहे हे सिद्ध करण्यास्तव हा सारा खटाटोप श्री. बेंद्रे यांनी केली आहे

६ देहूकर तुकोबांची एकंदर अभंगवाणी लक्षांत घेता ती उत्स्फूर्त स्वरूपाची आहे. निरनिराळ्या वृत्तींतून ते परमात्म्याशी विहरले आहेत. एका विशिष्ट साच्याचे मर्यादेने ती विहरणारी नाही. एखाद्या ग्रंथाचा अनुवाद करण्याच्या प्रकृतीची ती नाही. भगवद्गीतेवर ज्ञानेशांची रसाळ टीका होतीच. तीवर पुन्हा आपण लिहिण्यापूर्वी निदान तुकोबानी तिचा उल्लेख करून वंदन तरी केले असते. मंत्रगीतेतील अभंगात या प्रकारचा मागमूसही नाही. भाषा अगदी रूक्ष व बोजड आहे. देहूकर तुकोबांच्या वाणीत तडफ, माधुर्य, स्पष्टवक्तेपणा इत्यादी गुण आहेत. त्यांचा येथे पूर्ण अभाव आहे. रूपांतर व्यवस्थित नाही. भाषाही अगदीच सामान्य आहे. उदाहरण द्यायचे झाल्यास श्री. बेंद्रे यांनीच दिलेले गीतास्तुतीचे घेता येईल. देहूकर तुकोबांच्या एका अभंगांत गीतेची थोरवी वर्णिली आहे—

> आहे भगवद्गीता। पूर्ण अमृतसरिता ॥
> एक एक अक्षरात। आहे माझा रमाकांत ॥
> जो हा सगुण निर्गुण। एक रुक्मिणीरमण ॥
> तुका म्हणे ज्ञानेश्वरी। आत्मपदीची सोयरी ॥

याच्याच जोडीस श्री. बेंद्रे यांनी दिलेला गीतानुवादातील २३२ वा अभंग पाहा—

> तुका वदे विचक्षणी। मांदुस गीता रत्नखाणी ॥
> घ्यावी एकेक निवडुनी। वचने शेषशायीची ॥

७. देहूकर तुकोबांच्या नंतर तुकाराम नावाचे सात कवी होऊन गेले. त्यांची यादी रा. बेंद्रे देतात—१ तुकाराम वर्दे २ तुकोजीपंत रमावल्लभदास ३ तुकोबा रामदासी ४ तुकोबा गोसावी उंडवडीकर ५ तुकाराम व गिरिराम ६ तुका विप्र व तुकोबा येहळगावकर. हे सातही तुकाराम ब्राह्मण होते. रा. बेंद्रे यांचे म्हणणे असे की गीतानुवादकार तुकाराम स्वतःस वाणी म्हणवितो. याला उदाहरण " बंधूतेही रणांगणी। तुका **वाणी** यालागी " दिले आहे. यांत वाणीचा अर्थ वैश्यवाणी नसून ' वर्णन करितो. (अ. २५) असा आहे. " ययालागी तुका **वाणी**। हे मिशाणी कर्माचो ॥ (१२१) यांतही वाणी याचा अर्थ

वर्णन करितो असा आहे. " मति समजली धृति । तुक्या वैश्यासारखी ॥ ( ३८५ ) येथे तुक्या शब्दाचा वैश्याकडे संबंध नाही. तर 'वैश्यासारखी धृति' असा संबंध आहे. आहे. तेव्हा या पदावरून येथे तुकावाणी विवक्षित नाही.

८. तुकोबांच्या स्फुट अभंगांतून गीतेचा आशय काही ठिकाणी गोडपणे आला आहे. तो व प्रस्तुत अनुवाद तोलून पाहता अनुवाद अगदीच फिका वाटतो. याचे एकच उदाहरण देतो. तुकोबांनी अभंगलेखनास सुरुवात श्रीकृष्णाच्या बालक्रीडेवरील अभंगाने केली. सुरुवातीचे असले तरी हे अभंगशतक अत्यंत रसाळ आहे. या बालक्रीडेच्या अभंगानंतर तुकोबांनी मंत्रगीता रचली असे श्री. बेंद्रे म्हणतात. गीतेच्या ९ व्या अध्यायातील २६ वा श्लोक प्रसिद्ध आहे. तो असा—

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥

बाळक्रीडेतील एका अभंगांत या श्लोकाचा आशय तुकोबांनी सहज सुंदर गोडीने सांगितला आहे —

पोट धाले मग देतसे ढेकर ।
भक्तीचे ते फार तुळसीदळ ॥
तुळसीदळ भावे सहित देवा पाणी ।
फार ते त्याहुनी क्षीरसिंधु ॥
क्षीराचा कंटाळा असे एक वेळा ।
भक्तीचे जळ गोड देवा ॥

गीतानुवादांत या श्लोकावर पुढील अभंग आहे.

संकटे ते नाही वैष्णवा पूजेचे ।
स्वल्प हातवटीचे वर्म सांगो ॥
पत्र हो वृक्षाचे तुळसी बेलाचे ।
फुलही फुकाचे सांपडे जे ॥
नातरी पाण्याचे संकट पडेना ।
हे तो मी हिंवेना भक्तितापे ॥ इ.

अशी उदाहरणे दोहोमधील भाषेच्या फरकाची अनेक देता येण्याजोगी आहेत.

९ वरील सर्व कारणावरून गीतानुवादकर्ते हे देहूकर तुकोबाहून भिन्न आहेत हे उघड दिसते. मग हे गीतानुवाद करणारे तुकाराम कोण? श्री. बेन्द्रे यांनी जी तुकाराम नावाच्या अन्य सात व्यक्तींची माहिती दिली आहे त्यांपैकी हे नव्हेत. परंतु या साताखेरीज आठवे तुकाराम होऊन गेले. त्यांची खबर श्री. बेंद्रे यांना नाहीं. या आठव्या तुकारामाची माहिती श्री. बेंद्रे यांनीं उल्लेखिलेल्या बेळगावच्या श्री. नाइक यानी प्रसिद्ध केलेल्या " श्रीमद्भगवद्गीता " [ मराठी टीकासहित ) या पुस्तकाच्या पहिल्या अध्यायातल्या प्रस्तावनेत दिली आहे. या पुस्तकाची फक्त सुटी पाने श्री. बेंद्रे यांनी पाहिलेली दिसतात. प्रस्तावना पाहावयास मिळालेली दिसत नाही. संपादकांनी पुढीलप्रमाणे माहिती दिली आहे.—

" या ग्रंथातील तुकाराम पांडुरंगदास हे साधुवर्य तुकाराम नव्हेत. हे जातीने देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून नगर जिल्ह्यांत जामखेडे पेठ्यांत खर्डे येथे राहात असत. यांचे नाव तुका विप्र बोरवनकर अगर अंजनवतीकर असे आहे. हे आपणास तुकाराम पांडुरंगदास असे म्हणवीत. या पांडुरंगदासवरून ही गीताटीका प्रसिद्ध साधुवर्य तुकाराम यांच्या नावावर मोडली जाऊ लागली. ह्यांची मूळ वृत्ति कुळकर्णीपणाची होती. मूळ आडनाव क्षीरसागर असे होते. ते पांडुरंगाचे एकनिष्ठ भक्त होते म्हणून आपणास पांडुरंगदास असे म्हणवीत असत. आपली परंपरा ज्ञानदेव सच्चिदानंद बावा ×××× तुकाराम अशी देतात. खर्डे नजीक वेलेश्वरी यांची समाधि असून श्रावणमासी यात्रा भरत असते. हे तुकाराम अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात शाहू महाराजांच्या अमदानीत हयात होते. यांचा मूळग्रंथ श्री. तात्यासाहेब कुलकर्णी, क्षीरसागर, मुक्काम खर्डे, यांजकडे आहे. ही सर्व माहिती आम्हांस श्री. अमृत बापुजी रसाळ, राहुरी, जि. नगर याजकडून मिळाली '. ( निवेदन-पृ. ३ )

१० वर दिलेल्या शेवटच्या हकीकतीवरून तर सर्व संशयनिवृत्ती होते. गीतेचा अभंगानुवाद हा देहूकर तुकोबाचा नसून वर वर्णिलेल्या खेड येथील तुकाराम पांडुरंगदास यांचा होय. डॉ. तुळपुळे यांनी महाराष्ट्र सारस्वताच्या नवीन पाचव्या आवृत्तीच्या पुरवणीत स्पष्ट म्हटले आहे की, " अलीकडे संशोधक बेन्द्रे यांनी पूर्वी अनेकदा छापून निघालेल्या 'मंत्र-गीते' चे शास्त्रोक्त संपादन करून ती तुकारामकृतच होय असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो यशस्वी झाला आहे असे वाटत नाही. " ( पृ. ८४९ ) डॉ. तुळपुळे यांचे अनुमान वरील विवेचनावरून किती सत्य आहे ते स्पष्ट दिसून येते.

# भाषाशुद्धीची कैफियत

● नी. र. वऱ्हाडपाण्डे ●

माणसाने स्वतःच्याच पायावर का चालावे? दुसऱ्याच्या पायावर चालण्यास काय हरकत आहे? स्वतःच्याच डोळ्याने का पाहावे? दुसऱ्याच्या डोळ्याने पाहण्यास कोणती हरकत आहे? असे प्रश्न कोणी विचारीत नाही व विचारल्यास "तो एक जाणता" या मालिकेत जमा होण्याची भीति असते. पण या देशात मात्र स्वभाषेतच व्यवहार का करावा? परभाषेत केल्याने काय बिघडते. बरे, स्वभाषा वापरण्याचा मूर्खपणा केला तर केला, तिच्यात पुनः स्वभाषेचेच शब्द असावेत असा वेडेपणाचा आग्रह कशाला? इंग्रजी व फारसी शब्द वापरल्याने कसला विटाळ होतो? असे प्रश्न मोठ्या प्रतिष्ठित लोकांकडून विचारले जातात. त्यामुळे या प्रश्नाची चर्चा करणे आवश्यक होऊन बसले आहे.

## सोपा "ड्रामा" व कठीण "नाटक"

परकीय शब्दांच्या पुरस्कर्त्यांचे असे म्हणणे आहे की परकीय शब्द सोपे आहेत. ते काढून त्यांच्या जागी कठीण संस्कृत शब्द वापरणे हा द्राविडी प्राणायाम आहे.

इंग्रजी व फारसी शब्द संस्कृत शब्दांपेक्षा सोपे असतात या विधानाचा अर्थ काय असा यावर प्रश्न उपस्थित होतो. ज्याच्या घरी मराठी बोलले जाते व ज्याने इंग्रजी व फारसीवर मराठीपेक्षा अधिक प्रभुत्व मिळवलेले नाही त्यालादेखील इंग्रजी व फारसीपेक्षा संस्कृत शब्द कठीण वाटतील असे भाषाशुद्धिविरोधकांचे म्हणणे आहे काय? हिंदीत व्यवहार करणाऱ्या व्यक्तीला "प्रचारा"पेक्षा "प्रापोगंडा", "पीठा"ऐवजी "अकादमी", "नाटका"ऐवजी "ड्रामा" व "लघुलहरी"ऐवजी "शार्ट वेव्ह" हे शब्द सोपे वाटतील असा कुणाचा आग्रह असेल तर त्याच्याशी वाद करणे व्यर्थ आहे.

साधारणपणे असे म्हणता येईल की लहान शब्दांपेक्षा मोठे शब्द व साध्या अक्षरांपेक्षा जोडाक्षरे उच्चारणे कठीण असते. या दोन्ही दृष्टींनी पाहिले तरी संस्कृत शब्दांपेक्षा इंग्रजी शब्द बहुधा कठीण असतात. प्रचार शब्दांत एकच जोडाक्षर व तीन वर्ण आहेत, तर प्रापोगंडा शब्दांत दोन जोडाक्षरे व चार वर्ण आहेत, पीठ शब्दात दोनच वर्ण तर अकादमी शब्दात चार वर्ण आहेत, नाटक शब्दात एकही जोडाक्षर नाही तर ड्रामा शब्दांत पहिलेच जोडाक्षर आहे.

## लाघव व अर्थपूर्णता

उच्चारसौकर्याप्रमाणे लाघव हे सोपेपणाचे एक महत्त्वाचे अङ्ग आहे. या दृष्टीने "हारजीतका फैसला हुए बिना मेच खतम हुई" यापेक्षा "द्वन्द्व अनिर्णित रहा" व "घरेलू मामलोंके वजिर" याऐवजी "गृहमंत्री" या गीर्वाण-रचना खचित अधिक सोप्या आहेत.

अर्थबोधकता हे सोपेपणाचे तिसरे महत्त्वाचे अङ्ग आहे. अर्थबोधकतेच्या दृष्टीने भारतीय भाषकाला इंग्रजी शब्दापेक्षा संस्कृत शब्द केव्हाही सोपेच वाटणार. साहित्य अकादमीपेक्षा साहित्यपीठ त्याला अधिक लवकर समजेल; कारण विद्यापीठ, व्यासपीठ वगैरे इतर अनेक संदर्भात तो शब्द त्याला परिचित असतो. प्रापोगन्डापेक्षा प्रचार शब्द हिन्दी भाषी माणसाला केव्हाही लवकर मानवेल; कारण आचार, विचार वगैरेच्या अनुरोधाने उच्चार, प्रचार वगैरे शब्दांचे अर्थ सहज लागतात. हिन्दी वर्तमानपत्रे वाचणाऱ्याला लघू व लहरी हे शब्द माहीत असतील अशी अपेक्षा करण्यात अवास्तविक असे काही नाही. उलट शॉर्ट व वेव्ह हे शब्द इंग्रजी शिकलेल्यांशिवाय इतरांना माहीत असतील अशी अपेक्षा करता येत नाही. तेव्हा लघुलहरीऐवजी शार्ट वेव्ह हा शब्द वापरल्याने भाषा सोपी होईल असा आग्रह कुणाच्या वतीने धरण्यात येतो हे कळणे कठीण आहे.

पुष्कळ वेळा एखादा इंग्रजी शब्द संस्कृत शब्दापेक्षा अधिक प्रचारात असतो. उदाहरणार्थ स्टेशन, बॉम्ब, पेट्रोल, वगैरे. तेव्हा आज या शब्दांऐवजी स्थानिक, गोल व मार्तेल हे शब्द अधिक कठीण म्हणजे अपरिचित वाटतील हे खरे आहे. पण या इंग्रजी शब्दांचा प्रचार इंग्रजांच्या शैक्षणिक व राजकीय धोरणामुळे झालेला आहे. निसर्गसिद्ध नियमांनी झालेला नाही परिवहन खात्याने स्टेशनाऐवजी स्थानक शब्द वापरला, सैन्याने "बॉम्ब" ऐवजी "गोल" वापरला व शालेय शिक्षणातून "पेट्रोल" ऐवजी "मार्तेल" वापरले, तर पाच,

अनुक्रमणिका

दहा वर्षांत "स्टेशन," "बॉम्ब" व " पेट्रोल " प्रचारातून नाहीसे होऊन स्थानक, गोल व मार्तेल यांचाच प्रचार होईल. लोकमान्य टिळक संस्कृत व मराठी भाषांचे प्रभु होते. तरीही "बुक" ऐवजी "पुस्तक"म्हणणे त्यांना कृत्रिमपणाचे वाटत होते. पण त्यानंतर शिक्षणात मराठी भाषेला अधिक मानाचे स्थान मिळून शाळांतून " पुस्तक " वापरले जाऊ लागले. आज कुणालाही " पुस्तका " पेक्षा " बुका " त काहीतरी अधिक नैसर्गिक आहे असे वाटत नाही आधुनिक कालात शासनव्यवस्था जीवनाच्या सर्व अंगांना व्यापू लागली आहे. कोणतेही शब्द प्रचारात आणणे तिला सहज शक्य आहे. त्यामुळे अमुक शब्द प्रचारात आहे या गोष्टीला अवास्तव महत्त्व देण्याचे कारण नाही.

### " चोराच्या उलट्या...... "

शिवाय पुष्कळ वेळा अमुक फारसी वा इंग्रजी शब्द अधिक प्रचारात आहे हा दावा मुळातच निराधार असतो. टाइम, इस्तेमाल, रहेम वगैरे शब्द वेळ, उपयोग, दया इत्यादी शब्दांपेक्षा अधिक प्रचारात आहेत असे धडाकून सांगण्यात येत असते. मराठी वाचकांना हे किती धडधडीत खोटे आहे हे पटवून द्यायची जरूर नाही. मराठीच केवळ नव्हे तर भारतातील इतर भाषांत वरील सार्वजनिक म्हटले जाणारे शब्द प्रचलित नाहीत, हे खालील तालिकेवरून दिसून येईल.

| | संस्कृत | पंजाबी | गुजराती | उडिया | मराठी | तामिल |
|---|---|---|---|---|---|---|
| टाइम... | समय काल | चिर | समय | समय | वेळ | नैरम् समयम् |
| इस्तेमाल.. | उपयोग | वर्तना | वापरु उपयोग | व्यवहार उपयोग | उपयोग | उपयोगम् |
| रहेम्... | दया | दया | दया | दया | दया करुणे | दया |

| | तेलगू | मल्याळम् | कन्नड | बंगाली |
|---|---|---|---|---|
| टाइम... | समयम् | समय | समय | समय |
| इस्तेमाल.. | उपयोगम् | उपयोग | उपयोग | प्रयोग |
| रहेम्... | दया | | करुणे | करुणा |

संस्कृत शब्दांचा प्रचार तामिलसारख्या तथाकथित " द्राविड " भाषा धरून सर्व भारतीय भाषांत आहे. एवढेच नव्हे तर सिलोन व दक्षिणपूर्व आशियातील भाषांतदेखील आहे. असे असून संस्कृत शब्दांच्या विरुद्ध प्रचार केला जातो याचे कारण आपल्या देशातील शिक्षणपद्धतीत इंग्रजीचे अवास्तव स्तोम माजलेले आहे. शाळेत पाय ठेवल्यापासून मुलाशी इंग्रजी बोलण्यात येते, एवढेच नव्हे तर घरी पालकांनीही मुलाशी इंग्रजी बोलावे अशा शाळेतून सूचना येतात. अनेक " पुरोगामी " " आधुनिक " स्वतः-च्या मुलाशी पाळण्यातही इंग्रजी बोलतात. नोकरांना शिव्या देण्याच्या कार्याव्यतिरिक्त देशी भाषांचा काही उपयोग आहे, असे या वर्गाला वाटत नाही. अशा वातावरणात वाढलेल्या मुलाला संस्कृतच काय, देशी भाषांतले सारेच शब्द अपरिचित वाटणार. अशा लोकांनी हिन्दी कठीण आहे असे म्हणणे, हे लंडनच्या गाडीहाक्याने चिनी कठीण आहे व पिऱ्या शेतकऱ्याने इंग्रजी कठीण आहे असे म्हण-ण्यासारखेच आहे.

उत्तर हिंदुस्थानात इंग्रजीच्या जोडीला उर्दू व फारसी-चाही ससेमिरा देशी भाषाच्या मागे आहे. पंजाबची भाषा पंजाबी व काश्मीरची भाषा काश्मिरी आहे. या भाषांची शब्दावली इतर भारतीय भाषांप्रमाणेच संस्कृतप्रधान आहे. असे असून या प्रांतात शाळेपासून अ, आ ऐवजी अलिफ, बे सुरू होते वा होत असे. मातृभाषेचा उपयोग अशिक्षितांतच फक्त होत असे ! ज्यांचा शैक्षणिक व व्यावसायिक व्यवहार याप्रमाणे उर्दू इंग्रजीतूनच होतो त्यांना स्वतःची मातृभाषा व संस्कृत शब्दावली कठीण वाटली तर नवल नाही. नवल या गोष्टीचे आहे की साऱ्या भारताने आपल्या अज्ञानाच्या तालावर नाचले पाहिजे असा आग्रह हे लोक धरीत आहेत.

### सरल हिन्दी

उर्दू भाषेचे स्वरूप व भारतातील स्थान याबद्दलदेखील या लोकांनी बराच मिथ्या प्रचार केलेला आहे. भाषाविदांनी उर्दू ही हिन्दीची एक साहित्यिक शैली मानली आहे व तेच यथार्थ आहे. उर्दू ही कुणाचीही मातृभाषा नसते. शिक्षण व शासन यांत उर्दू वापरले गेले नाही तर ते नामशेष होईल. काश्मिरी, पंजाबी वगैरे भाषांना शिक्षण व राजव्यवहार यात अनेक वर्षे मज्जाव असूनही लाखो लोक काश्मिरी व पंजाबी बोलतात. उर्दूचे तसे होणार नाही. कारण उर्दू ही लोकभाषा नाही. साहित्य व राज-व्यवहार यांव्यतिरिक्त उर्दूला वूडच नाही. शाळा व सरकारे यांनी उर्दूला उत्तेजन दिले नाही, तर उर्दूने प्रचारात आणलेले फारसी शब्द पाहता पाहता दिसेनासे होतील.

आजदेखील एका विशिष्ट क्षेत्रात फारसी व उर्दू परि-चित असल्या तरी अधिक विस्तृत क्षेत्रात त्या अपरिचित

आहेत. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या प्रदेशात वर्तमानपत्री मराठीपेक्षा वऱ्हाडी, कोकणी, कोल्हापुरी वगैरे अधिक परिचित असल्या तरी अखिल महाराष्ट्राच्या दृष्टीने वर्तमानपत्री मराठीच अधिक परिचित आहे. विस्तृत प्रदेशावर समजली जाणारी प्रमाणभूत भाषा स्वतःच्या प्रदेशातील बोलीपेक्षा अधिक अपरिचित वाटणारच. तेव्हा नेहमीच्या प्रचारातली भाषा कोणती हे ठरविताना कोणत्या प्रदेशाचा आपण विचार करीत आहोत हे स्पष्ट केले पाहिजे. अखिल भारताचा विचार केला तर संस्कृतमय हिन्दी हीच दुसऱ्या कोणत्याही भाषेपेक्षा अधिक सार्वत्रिक प्रचारात आहे हे कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाही.

## शब्द व त्याची रूपे

शिवाय एखादा फारसी शब्द अधिक प्रचारात आहे म्हणून संस्कृत शब्दाऐवजी तो वापरावा असे म्हणण्यात शब्द व त्याची इतर रूपे यांची फारकत केली जाते. मराठीत लॉ या अर्थी विधी या शब्दापेक्षा कायदा हा शब्द अधिक प्रचारात आहे हे खरे आहे. पण तरी "विधि"चे काम "कायदा" करू शकणार नाही. कारण विधि शब्दापासून वैध, वैधानिक, संविधान, विहित वगैरे शेकडो शब्द होतात. तसे कायद्यापासून होत नाहीत. कायद्यापासून देखील कायदिक, कायदानिक, संकायदा, कायदित वगैरे रूपे करावी असे म्हणण्यास परकीय शब्दांचे कैवारी धजावतील असे वाटत नाही. बरे सुसंगतीसाठी तसे म्हटले तरी प्रचारात असणे हा गुण "कायद्या"त असला तरी कायदिक, संकायदा, कायदानिक, कायदित वगैरे शब्दात तो मुळीच नाही. त्यामुळे ते वापरण्यास काहीच समर्थन उरत नाही. तेव्हा एखादा शब्द अधिक प्रचारात असला तरी तो सर्रास वापरल्याने भाषा सुबोध होण्यास मदत होईलच असे नाही.

फारसी वा इंग्रजी शब्द अधिक सोपे आहेत वा अधिक प्रचारात आहेत म्हणून त्यांचा वापर करावा हा युक्तिवाद याप्रमाणे टिकण्यासारखा नाही. पण एवढ्याने परकीय शब्दांची कैफियत संपत नाही. विद्यापीठीय शिक्षण घेतलेल्या वर्गात इंग्रजी शब्दांचाच नव्हे तर भाषेचाही प्रचार आहे. तसेच पश्चिम उत्तर प्रदेश, पंजाब येथे शालेय शिक्षण घेतलेल्या वर्गात फारशी शब्दांचा बराच प्रचार आहे हे खरे आहे. मग त्यालाच उत्तेजन देऊन इंग्रजी व फारसी शब्द सगळ्याच भारतीय भाषांतून विशेषतः हिन्दीतून वापरले तर काय बिघडते? उलट त्यामुळे आपल्यां भाषांना नवीन शब्दसंपत्ती प्राप्त होऊन त्या अधिक संपन्न होत नाहीत काय, असे विचारण्यात येते. त्यावर उत्तर देणे जरूर आहे.

अधिक शब्द असल्याने भाषा संपन्न होते हे खरे असले तरी परकीय शब्दाचे समर्थक संस्कृत शब्दांऐवजी फारसी वा इंग्रजी शब्द वापरावे असे म्हणत असल्यामुळे त्यांच्या सूचना अमलात आणल्याने देशी भाषांची शब्दसंपत्ती वाढण्याचा संभव नाही. उपयोगाची जागा इस्तेमाल व वेळाची जागा टाइमने घेतल्याने शब्दसंपत्तीत काय भर पडणार आहे? थैलीतला एक रुपाया फेकून दिला व त्याऐवजी एक रुपया नवीन टाकला तर त्यांमुळे थैलीत भर कशी पडणार?

## एकसूत्री शब्दावली

वाटेल त्या भाषेतले शब्द आपल्या भाषेत असल्याने ती समृद्ध होते असे म्हणणाऱ्यांनी भाषेची समृद्धी म्हणजे काय याचा नीट विचार केलेला नसतो. भाषा हे भावना व विचार व्यक्त करण्याचे साधन आहे. हे साधन कार्यक्षम आहे की नाही हे ठरवण्याचे अनेक निकष आहेत. त्यापैकी संस्कृतविरोधक ज्यासाठी ओरड करतात तो सोपेपणा हा एक आहे. पण सोपेपणाबद्दल देखील संस्कृत–विरोधकांच्या कल्पना फार भ्रान्त आहेत. परिचित असलेला शब्द सोपा वाटतो हे खरे असले तरी जे मला परिचित आहे तेच दुसऱ्याला अपरिचित असू शकते. यामुळे परिचितपणा हा निकष व्यक्तिसापेक्ष आहे.

परिचितपणापेक्षा स्मरणसुलभता हा सोपेपणाचा निकष अधिक वस्तुनिष्ठ आहे. कोणतीही भाषा शिकताना तिची शब्दावली व वाक्प्रचार आत्मसात् करण्यास सर्वांत जास्त काळ लागतो, इंग्रजीचे व्याकरण सोपे असल्यामुळे पहिल्या वर्षी लवकर प्रगती होते व ही भाषा फार सोपी आहे असे वाटते. पण पुढे जन्मभर इंग्रजीच्या सान्निध्यात राहूनदेखील कोशाशिवाय भागत नाही व मोठमोठे आंग्लमन्य इंग्रजीच्या वाक्प्रचारात हास्यास्पद चुका करतात.

याचे मुख्य कारण असे आहे की, इंग्रजीत अनेक भाषातले शब्द आले आहेत व त्यामुळे इंग्रजी शब्दावलीत एकसूत्रता नाही. मूळ दोन हजार धातूंचा अर्थ माहित असला की संस्कृतातील यच्चयावत शब्दांचा अर्थ

आपोआप माहीत होतो. इंग्रजीत ही सोय नाही. त्यामुळे प्रत्येक शब्द हा स्वतंत्र व स्वयंभू समजून त्याचा अर्थ लक्षात ठेवावा लागतो. "फिलॅटेली"चा अर्थ स्टँप गोळा करणे असा असला तरी स्टँप शब्द माहीत असल्याने "फिलॅटेली"चा अर्थ कळण्यास मदत होत नाही. "लिटिगेशन"चा अर्थ कोर्ट, कज्जे करणे असा असला तरी कोर्ट वा लॉ हे शब्द माहीत असणाऱ्याला लिटिगेशनचा अर्थ अंदाजता येणार नाही. "लॉजिक" म्हणजे तर्क यावरून "लॉजिस्टिक्स"चा अर्थ अंदाजू गेल्यास गोता खावा लागेल कारण सैन्याच्या तळांची हालचाल असा तो अर्थ आहे. "लॉजिक"पासून हा पल्ला फार दूर आहे. गार्डन म्हणजे बगीचा हे कळत असून देखील हॉर्टिकल्चर म्हणजे बागकाम असा बोध होत नाही. इंग्रजीची ही परस्परविलग शब्दसंपत्ती आत्मसात करायला जन्म खर्ची पडावा लागतो.

## संस्कृताची सुव्यवस्था

भाषेच्या सुबोधतेच्या दृष्टीने संस्कृताची कास सोडून चालणार नाही. याचे प्रत्यंतर अनेक उदाहरणांनी दाखवता येईल. संस्कृतविरोधक प्रसारित न म्हणता ब्रॉडकास्ट म्हणावे असा आग्रह धरतात. त्यांचेच म्हणणे पुढे चालवून प्रतिप्रसारणाला रीले म्हणावे, उत्सारणाला जॅमिंग म्हणावे, प्रसारित्राला ट्रॅन्समिटर म्हणावे. आज तसे म्हटलेच जाते व पाळण्यापासून इंग्रजीचा मारा करण्याच्या या दिवसांत त्यात काही कठीण आहे असे कुणास वाटत नाही. पण इतर स्वतंत्र देशांप्रमाणे आपल्याही देशात इंग्रजीचे प्रस्थ कमी झाले तर एकाच सृ धातूला प्र, प्रति, उत् वगैरे मोजके उपसर्ग व त्र सारखे मोजके प्रत्यय ठरीव नियमांनी लावून साधलेले प्रसारण, प्रतिसारण, उत्सारण, प्रसारित्र वगैरे शब्द लक्षात ठेवणे, ब्रॉडकास्ट, रीले, जॅमिंग, ट्रॅन्समिटर वगैरे एकमेकांशी काही संबंध नसलेले स्वच्छंदी शब्द लक्षात ठेवण्यापेक्षा केव्हाही सोपे जाईल. दशांशपद्धतीत दहा चिन्हांचा नियमबद्ध वापर करून असंख्य संख्या लिहिता येतात. त्या असंख्य असल्या तरी नियमसिद्ध असल्यामुळे त्यांचे आकलन होणे जड जात नाही. उलट थोड्याशा चिन्हांनी यच्चयावत् संख्या व्यक्तविण्याची सोय रोमन-पद्धतीत नसल्यामुळे या पद्धतीने संख्यांचे आकलन करणे दुरापास्त होते. संस्कृताच्या नियमबद्ध शब्दसिद्धीची कास सोडून वाटेल ते फारसी वा इंग्रजी शब्द वापरणे दशांश-पद्धती सोडून रोमन पद्धतीचा अंगीकार करण्यासारखे आहे.

परकीय शब्दामुळे भाषेच्या सामर्थ्याला बाधा पोचते. तसेच परकीय शब्दांबरोबर घुसणाऱ्या परकीय व्याकरणाने भाषेतील अराजकाला सीमाच उरत नाही. बस शब्द घेतला की त्याचे बसा हे अनेकवचन वापरायला आंग्ल-शिक्षित तयार होत नाही. तो बसेस म्हणणार. लब्ज शब्द घेतला तर अलफाज या अनेकवचनाला मज्जाव करणे कठीण आहे. शब्दाचे शब्द तसे लब्जचे लब्ज असे अनेक-वचन होणार नाही. इंटरेस्ट शब्द घेतला तर इंटरेस्टेड, इंटरेस्टिंग, हे त्याचे भाईबन्द आलेच. पण इंटरेस्टचे इंटरेस्टिंग व इंटरेस्टेड झाले तरी "गोडी" चे गोडेड व गोडिंग होणार नाही. म्हणजे चार भाषांतून शब्द घेतले की त्या चार मूळ भाषांचे व्याकरण व शब्द माहीत असणाऱ्यालाच फक्त भाषेतील शब्दांची रूपे बनवता येतील. केवळ स्वभाषेचा अभ्यास करणाऱ्याला तिच्यात काहीच व्यवस्था आढळणार नाही व ती शिकणे हे एक अचाट कार्य होऊन बसेल.

सोपेपणा व शब्दसमृद्धी हे भाषेचे गुण असले तरी पुष्कळ वेळा त्यांचे महत्त्व गौण असते. शास्त्रचर्चेत भाषा सोपी आहे की नाही यापेक्षा ती अचूक आहे की नाही हेच आधी पाहिले जाते. अशा भाषेत पुष्कळ वेळा एखादा शब्द लोकभाषेत प्रचलित आहे म्हणूनच त्याज्य ठरतो. कारण त्या शब्दाला अनेक नको असलेले अर्थ चिकटलेले असतात. शिवाय पुष्कळशा शास्त्रीय कल्पना प्रचलित शब्दांत व्यक्तच होऊ शकत नाहीत. म्हणून शास्त्रीय परि-भाषा मुद्दाम तयार करावी लागते. ती तयार करण्यास संस्कृतासारखे दुसरे साधन नाही.

## इंग्रजी म्हणजे जग नव्हे.

यावर संस्कृत विरोधकांचे असे म्हणणे आहे की सर्व शास्त्रांची परिभाषा इंग्रजीत आहेच. ही परिभाषा जागतिक आहे. तेव्हा ती सोडून नवीन परिभाषा करण्याचा उपद्व्याप कशाला!

अज्ञान व असत्य यांनी भरलेल्या युक्तिवादाचा एक मासला म्हणून या युक्तिवादाकडे बोट दाखवता येईल. हजारपाचशे इंग्रजी तज्ज्ञ व ज्यांना स्वतःच्या विषयाच्या उच्च अभ्यासासाठी फ्रेन्च, जर्मन, रशियन वगैरे भाषां-पेक्षा इंग्रजीचा उपयोग अधिक आहे असे हजारपाचशे विशेषज्ञ सोडले तर इतर कुणाही भारतीयाला इंग्रजी शिकण्याची गरज पडू नये अशी परिस्थिती निर्माणे

हे देशीभाषांच्या समर्थकांचे ध्येय आहे. संस्कृत परिभाषेची अनिवार्यता या ध्येयाच्या अनुरोधाने सिद्ध होते. जो इंग्रजी शिकला नाही वा शिकण्याचा ज्याचा इरादा नाही, त्याला एखाद्या विषयाचा अभ्यास करताना हजारो इंग्रजी शब्द आत्मसात करणे जड जाईल. त्या मानाने संस्कृताची एकसूत्री परिभाषा त्याच्या सहज पचनी पडेल.

शिवाय इंग्रजी परिभाषा जागतिक आहे; हा इंग्रजी-भक्तांचा दावा अज्ञानजन्य आहे. भौतिकीचा इंग्रजी-फ्रेन्च शब्दकोश, वा रसायनशास्त्राचा इंग्रजी-इटालियन शब्दकोश अशा वस्तु अस्तित्वात आहेत, याची या लोकांना वार्ताही दिसत नाही रक्षाविज्ञानखात्याचे एकेकाळचे प्रमुख डॉ. कोठारी यांनी एका व्याख्यानात सांगितले की, √‾ इत्यादि चिन्हांखेरीज विज्ञानाच्या क्षेत्रात जागतिक परिभाषेचे उदाहरण देणे कठीण जाईल. तेव्हा इंग्लंड व अमेरिका येथील पंधरावीस कोटी लोक म्हणजे जग अशी जगाची व्याख्या केल्याशिवाय इंग्रजी परिभाषेला जागतिक ठरवता येणार नाही.

उलटपक्षी संस्कृत पारिभाषेचे क्षेत्र जागतिक ठरण्यासारखे मोठे सहज होऊ शकते. भारताने या परिभाषेचा सार्वत्रिक वापर केला तर पूर्वबङ्गाल, सिलोन, ब्रह्मदेश, दक्षिणपूर्व आशिया, वगैरे भागांत ती परिभाषा हा हा म्हणता पसरेल. इंग्रजी परिभाषेच्या क्षेत्रापेक्षा हे क्षेत्र फारसे लहान राहणार नाही.

आतापर्यन्त फक्त विचारांच्या अभिव्यक्तीच्या दृष्टीने शब्दांचा विचार केला. पण विचारांची अभिव्यक्ती हेच केवळ भाषेचे कार्य नाही. विचाराबरोबरच भावनांची अभिव्यक्ती, सौन्दर्याचा आविष्कार ही ही भाषेची कार्ये आहेत. तेव्हा या दृष्टीने भाषेतील शब्दावलीचा विचार केला पाहिजे.

### मखमलीला गोणपाटाची ठिगळे

प्रत्येक भाषेची एक विशिष्ट ध्वनियोजना असते. या ध्वनियोजनेत वाटेल त्या दुसऱ्या भाषेचे शब्द चपखलपणे बसू शकत नाहीत मखमलीला गोणपाटाच्या धाग्याने वा खादीला रेशमाच्या धाग्याने रफू होऊ शकत नाही. जबरदस्ती केलीच तर ती डोळ्यांना दुःसह झाल्याशिवाय राहणार नाही. त्याचप्रमाणे संस्कृतप्रचुर भारतीय भाषेमध्ये इंग्रजी शब्दाची पखरण मखमलीला गोणपाटाची ठिगळे लावल्यासारखी सौन्दर्यविघातक वाटते. फारसी शब्द इंग्रजीच्या मानाने ठसकेबाज असतात. तरी देशी शब्दांच्या शेजारी ते विजोड वाटतात. उदाहरणार्थ,

( १ ) काल एक हिन्दी ड्रामा पाहिला. अ‍ॅक्टर्सनी आपले पार्ट नीट लर्न केलेले नव्हते.

( २ ) मी वफादार इन्सान आहे. माझा फर्ज काय हे मी पुरे महसूस करतो.

स्वरसङ्गतीस सरावलेल्या कानाला ज्याप्रमाणे बेसूर आवाज असह्य होतो त्याप्रमाणे मराठी भाषेत मुरलेल्या मनाला वरील वाक्ये ऐकून शिसारी आल्याखेरीज राहाणार नाही.

यावर शुद्धिविरोधक म्हणतील की "मराठी भाषेची प्रकृती ही काही अपरिवर्तनीय वस्तु नाही. फारसी व इंग्रजी शब्द सर्रास वापरले तर दहा पंधरा वर्षांत वरील वाक्यात प्रकट झाल्याप्रमाणेच मराठी भाषेची प्रकृती होऊन जाईल व मग ती तुम्हास खटकणार नाही.

याचे उत्तर स्पष्ट आहे. भाषेची ध्वनियोजना रोचक वाटण्यास परिचितपणापेक्षा दुसरे काही कारण नाही असे शुद्धिविरोधक गृहीत धरतात. असे गृहीत धरणे म्हणजे स्वरसंवाद व स्वरभंग यात केवळ परिचय व अपरिचय यामुळेच भेद पडतो असे म्हणण्यासारखे आहे. कोणत्याही भाषेचे मूलभूत ध्वनी कोणते व ते कसे उच्चारावे हे वस्तुनिष्ठ पद्धतीने निश्चित करता येते. परभाषेतले शब्द या मूलभूत ध्वनियोजनेत बसत नाहीत व जबरदस्तीने बसवले तर भाषेच्या बाबतीत सहृदय असणाऱ्यांना खटकल्याशिवाय राहत नाहीत.

### अकादमीला सिलुट्

यावर परकीय शब्द परकीय पद्धतीने न उच्चारता स्वभाषेच्या पद्धतीने उच्चारावे अशी तोड सुचवण्यात येते. "अ‍ॅकॅडमी न म्हणता अकादमी म्हणावे, salute न म्हणता सेलुट् म्हणावे म्हणजे हे शब्द स्वभाषेच्या शब्दांत बेमालूमपणे समावून जातील."

पण ही तोड फारशी समाधानकारक नाही. अ‍ॅकॅडमीचे अकादमी व salute चे सिलुट् हे देशीकरण इंग्रजी जाणणाऱ्यांना कर्णकटु वाटल्याशिवाय राहणार नाही.

काही शब्दांचे रूपांतर कर्णकटु वाटत नाही. उदा० सुलतानाचे सुरत्राण, वॅगनचे वाघीण. पण ही रूपांतरे ध्वनीच्या दृष्टीने कर्णकटु न वाटली तरी त्यांनी अर्थाचा अनर्थ होतो. देवद्वेष्ट्या सुलतानांना सुरत्राण म्हणणे व सामान वाहून नेणाऱ्या आज्ञाधारक वॅगनला वाघीण म्हणणे हा भाषासमृद्धीचा अजब प्रकार आहे.

अनुक्रमणिका

काही रूपांतरे कर्णकटु वा अर्थविघातक नसतात. उदा० सॉनेटचे सुनीत, हॉस्पिटलचे इस्पितळ. पण हे शब्द अर्थ-विघातक नसले तरी अर्थबोधक नाहीत. सॉनेट व हॉस्पिटल हे शब्द माहीत असल्याशिवाय त्यांची संगती लागत नाही. म्हणून त्यांच्याऐवजी चतुर्दशी, उपचारगृह वगैरेसारखे सार्थ शब्द रूढ केल्याने भाषा अधिक सोपी व अर्थवाही होईल.

परकीय शब्दच केवळ आपल्या भाषांचे सौंदर्य बिघड-वीत आहेत असे नाही; परकीय अक्षरेदेखील त्यात साथ देत आहेत. मराठीतून नावे लिहिताना देखील वाय. बी. देशपांडे अशी "पुरोगामी" पद्धत वापरण्याचा प्रघात पडत आहे. रोमन मुळाक्षरांप्रमाणे वाय. बी. देशपाडे चालते तर ग्रीक मुळाक्षरांप्रमाणे अफ्सायलन् वी. टी. देशपांडे व अरेबिक मुळाक्षराप्रमाणे ये. वे. देशपांडे का चालू नये! जगातील वाटेल त्या मुळाक्षरात आद्याक्षरे लिहून आपल्या भाषा समृद्ध करण्याचा राजमार्ग का सोडावा ?

## पावित्र्यविडम्बन

ध्वनिसौंदर्याप्रमाणेच भावगर्भता हा शब्दांचा एक महत्त्वाचा गुणधर्म आहे. या दृष्टीने आईच्या जागी मम्मी, राणी सीताऐवजी बेगम सीता, व भगवान श्रीकृष्ण ऐवजी लॉर्ड श्रीकृष्ण हे शब्दप्रयोग चालू शकत नाहीत. "वन्दे मातरम्" चा भाव "सलाम अम्माजान" मध्ये येऊ शकत नाही. स्वत्व गमावून दुसऱ्या कळपात शिरण्याची इच्छा उत्पन्न झाल्याशिवाय कोणताही समाज असले परकीय शब्द स्वीकारणार नाही. किंबहुना आम्हांला अलीकडे इंग्रजी शब्दांचा जो पुळका आला आहे त्याची कारणे भाषाशास्त्रीय नसून, कसेतरी करून आंग्लकुलोत्पन्न होण्याचा हव्यास हेच आहे. नाहीतर मुलाने आपल्याला बाबा न म्हणता डॅडी म्हटले म्हणून अंगावर मूठभर मास चढण्याचे काही कारण नाही.

ही मनोवृत्ती जिव्हाळ्याच्या वा कौटुंबिक शब्दांबद्दलच आहे असे नाही. फिजिक्सला फिजिक्सच म्हणावे, भौतिकी म्हणण्याचे काय कारण, असे जेव्हा विचारण्यात येते, तेव्हा फिजिक्स शब्दात काहीतरी निसर्गसिद्ध आहे व विज्ञानाचा इंग्रजी भाषेशी काहीतरी अतूट दैवी संबंध आहे अशी भावना सूचित होते वैज्ञानिक परिभाषेचे संस्कृतीकरण केल्याने ही भावना दूर होण्यास मदत होईल. विज्ञान ही इंग्रजांची मिरास आहे व आपण त्यात आगन्तुक आहोत या भाव-नेने विज्ञानाचा अभ्यास केल्यास भारतात विज्ञानाची मुळे रुजणे कठीण आहे.

आतापर्यंतच्या विवेचनावरून संस्कृत शब्दांव्यतिरिक्त कोणतेही शब्द भारतीय भाषांत वापरू नयेत असे माझे मत असल्याचा ग्रह उत्पन्न होईल. पण तो बरोबर नाही. संस्कृत व्यतिरिक्त खालील शब्द भारतीय भाषांतून येणे हानिकारक ठरणार नाही.

( १ ) निरनिराळ्या भारतीय भाषांमध्ये जे इतर कोण-त्याही भाषेतून आल्याचे स्पष्टपणे दिसत नाही असे खास शब्द आहेत या शब्दांच्या ऐवजीदेखील संस्कृत शब्द वापरण्याचा आग्रह धरणाऱ्यांना मराठीसारख्या भाषा अस्तित्वातच असू नये, मराठी भाषिकांनी संस्कृत बोलावे असा सिद्धान्त अंगिकारावा लागेल. संस्कृत शब्दांना केवळ मराठी प्रत्यय लावून तयार केलेली भाषा मराठी राहणार नाही. "इश्श", "अगबाई" चे संस्कृतीकरण होऊ शकत नाही.

( २ ) विशेषनामे ज्या भाषेतून आली असतील त्या भाषेतल्या स्वरूपातच कायम ठेवावी. इंग्रजी भाषेने विशेष-नामांची फार विकृती करून सोडली आहे. गंगेचे गॅन्जेस व कांचनगंगाचे किंचिंचिंगा आपल्या परिचयाचे आहे. पण सुक-र्णोचे सोकार्नो, नरोत्तम सिंहनुकचे नॅरोडॅम सिंहानुक, सिविरचे सैबेरिया, रसियाचे रशा, परीचे पॅरिस हे इंग्रजी विकृतीकरण आहे हे पुष्कळांना माहीत नाही. भारतीय भाषांत ही नावे मुळाप्रमाणेच वापरली पाहिजेत. ज्या नावाचे मूळ उच्चार भारतीय भाषांत विजोड वाटतात त्यांच्या उच्चारांचे भारतीयकरण करायला हरकत नाही. उदा. इंग्लिशचे आंग्ल.

( ३ ) जे परकीय शब्द शेकडो वर्षांच्या वाङ्मयात विखुरलेले व लोकभाषेत सार्वत्रिक रूढ झालेले आहेत ते खास कारण असल्याशिवाय काढू नयेत. कायदा हा शब्द मराठीत रूढ असला तरी त्याची विविध रूपे होऊ शकत नसल्यामुळे शास्त्रीय चर्चेस अनुपयुक्त म्हणून काढायला हरकत नाही. पण बरोबर, शिवाय वगैरे शब्द काढण्याचा खटाटोप समर्थनीय नाही.

साधारणपणे असे म्हणता येईल की जे परकीय शब्द **राजव्यवहार व शिक्षण यात परकीय भाषेचे साम्राज्य नसताना** शेकडो वर्षे भाषेत टिकू शकले ते स्वभाषेला पचले व मानवले, त्यांनी आपली उपयुक्तता सिद्ध केली.

आज ज्यांची तरफदारी करण्यात येते त्या इंग्रजी व फारसी शब्दांना हा न्याय लागू नाही. राजसत्तेच्या बळावर हे शब्द कृत्रिमपणे लादण्यात आलेले आहेत.

अनुक्रमणिका

# श्री शिवछत्रपती*

● दि. वि. काळे ●

'श्री शिवछत्रपती' हा प्रकाशनाचा प्रकार केवळ अपूर्व म्हणजे 'न भूतो' च नव्हे तर बहुधा 'न भविष्यति' अशा स्वरूपाचा आहे. शिवाजीच्या नावाचे माहात्म्य, शेजवलकरांच्या व्यासंगाबद्दल आदर आणि प्रकाशकाची कर्तव्यदक्षता यांचा त्रिवेणी संगम म्हणजे हे प्रकाशन या-पैकी कोणतीही एक गोष्ट कमी पडली असती तर हा ग्रंथ संभवत नव्हता. आणि हे सर्व अमोघ बळ पाठीशी असून-देखील यावरून शिवाजी महाराजांचे अद्भुत व्यक्तिमत्त्व, शेजवलकरांच्या व्यासंगाचे सूक्ष्मदर्शी विशालत्व, किंवा हौशी प्रकाशकांचे खरेखुरे वैभवशाली प्रकाशन–सामर्थ्य यांचे संपूर्ण दर्शन होते असे नाही. होणे शक्यही नाही. कारण यात छापलेल्या साऱ्या गोष्टी दुर्दैवाने अपुरेपणाचा छाप घेऊन प्रगट होत आहेत. त्यामुळे सुंदर छपाई, श्रीमंती सजावट, प्रभावी आकार, प्रचंड पृष्ठसंख्या आणि प्रोत्साहक विषय यांमुळे या पुस्तकाच्या नुसत्या दर्शनाने एरवी प्रसन्न व्हावयाचे ते वाचकाचे मन दुःखित होते. दि. २८ नोव्हेंबर १९६३ रोजी कै. शेजवलकरांच्यावर काळाने अकस्मात् झडप घातल्यामुळे महाराष्ट्राचे, महाराष्ट्रेतिहासाचे आणि विशेषतः शिवचरित्र-पूर्ततेकडे डोळे लावून बसलेल्यांचे केवढे न भरून येणारे नुकसान झाले आहे, याची कल्पना या पुस्तकाच्या अपुऱ्या अंतरंगावरूनही जाणत्यांना येते आणि त्यांची हळहळ वाढते. पण त्याबरोबरच एवढ्या सखोल व्यासंगी माणसाच्या हातून शिवचरित्राचे काम काढून घेण्याची घाई करणाऱ्या नियतीच्या मनात या महाराष्ट्राच्या आवडत्या राष्ट्रपुरुषाच्या समर्पक चरित्राविषयीची समस्या कोणत्या सुमुहूर्ताने सोडविण्याची योजना आहे याबद्दल कुतूहलही जागृत होते. शिवप्रेमी महाराष्ट्राच्या भावपूर्ण आवाहनाच्या जोडीला नियतीदेखील मागे राहिलेल्या रथीमहारथींना एक प्रकारचे आव्हान देण्यास सज्ज झालेली दिसते.

प्रस्तुत पुस्तक हे नेहमीच्या अर्थाने ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथाचे प्रकाशन नाही, तर ते प्रकाशकाच्या प्रकाशन-नीतीचा व प्रकाशनकौशल्याचा ग्रंथ असे अभिनव रूप घेऊन प्रगट होत आहे; हे त्याचे चिरस्मरणीय वैशिष्ट्य आहे. ग्रंथकार व ग्रंथप्रकाशक यांमधील सद्भावपूर्वक सहकार्याचे अनेक अभिनंदनीय व अनुकरणीय विशेष या प्रसंगाने ग्रंथविश्वात अवतरलेले दिसतात. त्यांची दखल इतिहासकाराला घ्यावी लागेल. न जाणो, यातून काही अभिनव अभ्यास-प्रकटनाचे अकल्पित आविष्कार अभावितपणे आकार घेतील. अशा प्रयोगांचे प्रत्येक प्रगती इच्छिणाऱ्या साहित्यिकाने मनःपूर्वक स्वागत केले पाहिजे.

शेजवलकरांच्या आकस्मिक निधनामुळे वैलक्षण्य प्राप्त झालेले 'श्री शिवछत्रपती' हे निधनोत्तरचे अरुण पुस्तक खरे म्हटले तर कर्त्याच्या कर्तृत्वाचे साकल्याने व प्रामुख्यानेही दर्शन घडविणारे नाही. त्यावरून प्रत्यंतर मिळते ते प्रकाशक 'मराठा मंदिर' या ध्येयनिष्ठ संस्थेच्या कल्पकत्वाचे आणि योजना–वैभवाचे. मंदिराच्या निवेदनात सांगितल्याप्रमाणे कै. शेजवलकरांनी ता. १ मे १९५९ रोजी संशोधनास प्रारंभ केला. त्यांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे अधून मधून वारंवार खंड पडत गेला. अशा परिस्थितीत त्यांचे संशोधन, वाचन व लेखन सुमारे साडेतीन वर्षे सतत चालू होते. त्यांना आणखी एक दोन वर्षे आयुष्य लाभले असते तर संकल्पित लेखन पुरे झाले असते. परंतु ते झाले नाही. आणि या साठ हजार रुपये खर्चून प्रकाशित झालेल्या ६५० पृष्ठांमध्ये शेजवलकरलिखित शिवछत्रपतींचे संपूर्ण चरित्र छापलेले नाही. छापलेली आहे ती 'संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने.'

'संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने' या सहा शब्दांच्या पोटमथळ्याचा आणखी परिष्कार अनुक्रमणिकेत, 'मंदिराचे निवेदन' या सरचिटणिसांच्या प्रास्ताविकात आणि 'श्रीशिवचरित्र साधन ग्रंथाच्या संकल-

*लेखक : त्र्यंबक शंकर शेजवलकर
प्रकाशक : गं. गो. गावडे, सरचिटणीस, मराठा मंदिर
डॉ. आनंदराव नायर रोड, मुंबई ८
किंमत तीस रुपये (पहिली आवृत्ती, १५ ऑक्टोबर १९६४)

अनुक्रमणिका

नाची दिशा ' या श्री. मा. रा. कंटक यांच्या खुलाशात केलेला आढळतो. शेजवलकरांचे साहाय्यक म्हणून श्री. माधवराव कंटक यांचा अधिकार लक्षात घेता त्यांनी या पुस्तकाचे नामकरण ' श्री शिवचरित्र–साधन ग्रंथ ' असे केले आहे आणि वर्गीकरण ' संकलन ' म्हणून सुचविले आहे, ते आपण स्वीकारले पाहिजे. शेजवलकरांसारख्या चोखंदळ चिकित्सकाचा शेवटचा हात जीवर फिरलेला नाही अशा त्यांच्या कोणत्याही स्वतःच्या कृतीबद्दल अन्य कोणी कितीही साक्षेपाने कार्य केले तरी ते अनेक प्रकारे कमीच पडणार याचे नवल वाटावयास नको. म्हणून प्रस्तुत संग्रहाबद्दल कोणत्याही प्रकारे तक्रार न करता, उलट सर्वप्रकारे कृतज्ञताच व्यक्तवून, आहे त्या परिस्थितीत आपल्या पदरात प्रत्यक्ष काय पडते, याचाच आढावा घेणे बरे.

शेजवलकरांच्या मनात सुमारे अडीचशे पानांची प्रस्तावना लिहावयाची होती व तीत ते जागतिक इतिहासाच्या पार्श्वभूमीवर शिवचरित्राचे मूल्यमापन करणार होते, असे कंटक सांगतात, ते अगदी खरे वाटते. मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासकात शेजवलकराच्या इतका जगातील इतर प्रदेशांच्या इतिहासांचा अभ्यास केलेला चिकित्सक विरळा. प्रसिद्ध झालेल्या शंभर पानी प्रस्तावनेचा प्रपंचच त्यांनी अशा ऐसपैस प्रांगणात आत्मविश्वासाने मांडलेला आहे. आपल्याला त्यांच्या अशा प्रकारच्या विचिकित्सेचा फक्त शेकडा चाळीस टक्के इतकाच लाभ झाला आहे याचे वाईट वाटल्याशिवाय राहात नाही.

जी गोष्ट प्रस्तावनेची तीच गोष्ट त्यांच्या 'काही प्रकरणे' या पुढील विभागाची. पृ. २६५ ते २८१ अशा एकूण १७ पानांत मिळून चरित्रक्रम आराखडा देऊन त्याची फोड केलेली आहे. शेजवलकरांनी १०७५ पृष्ठांचे २२ प्रकरणी ' शिवचरित्र ' आणि १००० पृष्ठांचा १९ प्रकरणी ' शिवाजीचा काल ' असे दोन प्रचंड खंड सादर करण्याचा संकल्प सोडला होता. पैकी पहिला खंड चरित्राचा. त्याचा आराखडा शेजवलकरांनी पाहून पसंत केलेला आहे. दुसरा शिवकालाचा. तो त्यांनी पाहिलेला नव्हता. तो पाहून कदाचित् त्यांनी पृष्ठसंख्या कमीजास्त केली असती. प्रकरणांची नावे किंवा त्यातील परिच्छेदांचे मथळे यांबद्दल विशेष काही म्हणण्याचे कारण नाही. परंतु ह्या सर्वज्ञात अशा ढोबळ घडामोडींची साधनचिकित्सा काटेकोरपणे करूनच शेजवलकरांनी निष्कर्ष काढले असते; आणि आपल्या व्यापक ज्ञानाचा उपयोग करून शेजवलकरांनी शिवछत्रपतीचे अत्यंत वास्तव आणि तरीदेखील तौलनिकदृष्ट्या अद्भुत व्यक्तिमत्त्व साकार करून दाखविले असते; याची काहीशी कल्पना असल्यामुळे, त्यांच्या परिपक्व चिकित्सेला महाराष्ट्र मुकला याची हळहळ वाटल्याशिवाय राहात नाही. राजवाड्यांवरदेखील टीका करणारे शेजवलकर राजवाड्यांच्याच गोत्रातील आहेत. शेजवलकरांच्या अनेक अतिरेकी आणि म्हणून असमर्थनीय वाटणाऱ्या मतांबद्दल त्यांच्यावर अनेकजण रुष्ट होतात आणि तरीदेखील कित्येकांना त्यांच्या विवेचनपद्धतीचे आकर्षण वाटते, ते त्यांच्या व्यापक व्यासंगामुळे, मूलग्राही मांडणीमुळे आणि चकित करणाऱ्या चिकित्सेमुळे.

ह्या त्यांच्या गुणाची वानगी त्यांच्या प्रस्तावनेप्रमाणेच त्यांच्या प्रकरण–खंडातूनही मिळते. अलीकडच्या ललित आणि कपोलकल्पित वाङ्मयातून रंगविलेल्या इतिहासविकृतींचे आव्हान स्वीकारण्याचा त्यांचा निश्चय त्यांच्या आधारभूत ग्रंथांच्या यादीत काही काव्ये व नाटके ( कादंबऱ्या नाहीत ! ) याचा समावेश केलेला पाहून ध्यानांत येतो. आणि त्याचे प्रत्यंतर ' अनुपुराण ' काव्याचे परीक्षण शिवाजी–संभाजी संबंध आणि काहीसे दक्षिण दिग्विजय या टिपणांवरून येते. ' काही प्रकरणे ' या विभागात छापलेल्या ' प्रकरणां'ची छाननी पुढे दिलेल्या आराखड्याच्या आधारे करून पाहिले, तर ' शिवाजी–इंग्रजी संबंध ' या प्रकरणाची संकल्पित पृष्ठे चाळीस आहेत. त्यांपैकी या संग्रहात सहाच आली आहेत. ' आग्र्याच्या सुटकेनंतर ' या विलक्षण घडामोडींच्या संकल्पिलेल्या पन्नास पानी प्रकरणाची फक्त आठच पाने यात देता आली आहेत. ' शिवाजी–संभाजी संबंध ' हे प्रकरण कसोटीचे. ते मूळ आराखड्यात दुसऱ्या एका प्रकरणाचा पोटभाग म्हणून योजिलेले होते. ते आणि 'दक्षिण दिग्विजय ' ही कुतूहलजनक प्रकरणे स्वतंत्र नावाखाली संग्राहकांनी दिली आहेत हे चांगलेच झाले. तथापि, एकंदरीत विचार करता पहिल्या दोन विभागांचा म्हणून या वेळी छापलेला मजकूर हा संकल्पित मजकुराच्या एकदशांशाइतकाच आपल्याला लाभत आहे. त्यामुळे जिज्ञासा चाळवल्यासारखी मात्र होते.

ग्रंथाचे स्वरूप मुख्यत्वे संकलनाचे आहे हे खरे असले, तथापि या संकलित मजकुराच्या ६५० पृष्ठांपैकी प्रस्तावनेची सुमारे शंभर आणि स्फुट प्रकरणाची सुमारे शंभर मिळून दोनशे पाने मजकूर हा सलग रचनेचा आणि अर्थात लेखकांची स्वतंत्र प्रज्ञा आणि प्रतिभा यांचे दर्शन घडविणारा आहे. शेजवलकरांनी लेखनोपयोगी सामग्री म्हणून

यापुढच्या भागात संग्रह केलेली फुटकळ माहिती आणि त्यांनी अंशतः सिद्ध केलेला ग्रंथाचा हा रचित अंश या दोहोंमध्ये संकलनदृष्टयाही त्यामुळेच फरक करावयास हवा. इतर माहिती जशीच्या तशी एकत्र करून भागेल; परंतु पहिल्या दोनशे पानांच्या संकलकांनी थोडीशी संपादनाची जोड संकलनाला देणे अवश्य होते, असे जिज्ञासू अभ्यासकांच्या वतीने म्हणावे लागेल. प्रस्तावनेमध्ये फार मोठ्या प्रमाणावर विविध आणि विविध प्रकारे खेळविलेले विषय आलेले आहेत. त्या परिच्छेदांना विषयानुसारी मथळे आणि अनुक्रम, परिच्छेदाच्या पोटात पोटक्रम वा पोटपरिच्छेद, आणि काही योजनेनुसार विशिष्ट शब्दांसाठी जाड ठसे उपयोजून वर्ण्य विषयाची सुबोध फोड करता आली असती. नाहीतरी हा मजकूर लोकांच्या पुढे आलाच आहे. तो सहज समजण्यासारखा करण्याने प्रकाशनाचा हेतू अधिक सफल झाला असता. संपादनाचे खास संस्कार स्पष्ट निर्देश करून मूळ लेखकाच्या कृतीपासून वेगळे काढण्यास केव्हाही प्रत्यवाय नव्हताच. अर्धवट स्वरूपात का होईना, हे सारे प्रकाशित करण्याचा प्रकाशकाचा श्रेष्ठ हेतू सिद्धीस जाण्यासाठी, अवश्य होते त्या प्रकारचे संपादन करण्याकडे दुर्लक्ष झाल्याचा दुसरा एक परिणाम असा झाला आहे की, जेथे संपादकाला किंवा 'संकलनकर्त्या'ला संपूर्ण स्वातंत्र्य निश्चितच होते, त्या सूचीचीही अभ्यासकाच्या दृष्टीने दैना उडाली आहे.

केवळ दोनशे पृष्ठांच्या मजकुराच्या नामसूचीखातर या पुस्तकाची वीसएकवीस पाने खर्च पडली आहेत, हे शेजवलकरांच्या बहुश्रुतत्वाला भूषणास्पद निःसंशय आहे. परंतु केवळ बहुश्रुत जाणत्या माणसालाच आज ही सूची उपयोगी पडणार आहे. या सूचीमध्ये विषयनिर्देश केला असता तर सूचीच्या उपयोगाने सामान्य वाचकही साक्षेपाने ग्रंथकर्त्याच्या अपेक्षेप्रमाणे बहुश्रुत झाला असता. बहुश्रुत वाचकालाही अवश्य तो संदर्भ नेमका त्वरेने मिळण्याची सोय झाली असती; आणि शेजवलकरांच्या मौलिक मतप्रदर्शनाचे प्रामाणिक प्रतिबिंब या सूचीमध्ये पडले असते.

हा मुद्दा फार विस्ताराने सांगण्याची आवश्यकता नाही. परंतु या एवढ्या समृद्ध प्रकाशनाला, कोणाच्याही अनवधानाने का होईना, अनाठायी काटकसरीचा शाप बाधल्यामुळे, ही सूची कशी पुरेशी कार्यक्षम झालेली नाही, याची दोनचार उदाहरणे दाखविणे अवश्य आहे. ( १ ) सूचीमध्ये 'अँग्लिकन' असा एकाकी शब्द दिलेला आहे. मूळ ग्रंथात त्याच्या जोडीला 'पंथ' असून त्या पृष्ठावरील विवेचन 'अँग्लिकन पंथ' या धर्मपंथाबद्दल आहे. विशेषणाने ध्वनित होणाऱ्या वंशाबद्दल नाही. ( २ ) सूचीमध्ये कित्येक ठिकाणी कंसामध्ये दौलताबाद ( देवगिरी ), कॉन्स्टँटिनोपल ( इस्तंबूल ) असे एकशब्दी स्पष्टीकरण दिलेले आहे. तेच तत्त्व वाढवून 'अंजुमन ( हैयमन )' एवढेच देऊन न थांबता 'मुसलमानांच्या स्वयंशासित वसाहती' असे स्पष्टीकरण सांगता आले असते. ( ३ ) ग्रँटडफ या नावाला सूचित जे पृष्ठ दिले आहे तेथे ग्रँटडफ यांच्याबद्दल वैयक्तिक निर्देश नसून त्याच्यावर विसंबून रविवर्म्याने शिवाजीचे चित्र काढले आणि त्या चित्रावरून शिवाजीच्या तीन जिवश्चकंठश्च मित्रांबद्दल समज रूढ झाला, वगैरे सुरस विवेचन सुमारे १५ ते १६ ओळींत केलेले आहे. ते पुनः काढून बघावयाची सोय या सूचीतील 'ग्रँट डफ' किंवा अन्य कोणत्याही नामनिर्देशावरून होण्याची व्यवस्था प्रस्तुत सूचीत नाही. ती कशी करता येईल हे येथे सुचविलेच पाहिजे असे नाही. परंतु 'ग्रँटडफ' पुढे 'रविवर्म्याचे चित्र व शिवाजीचे तीन मित्र' हा किंवा असा काही निर्देश उपकारक ठरला असता. 'राम गणेश गडकरी' यांचा असाच एक पानी निर्देश आहे. पण नाटके आणि इतिहास यांचा परस्पर संबंध तेथे चर्चिलेला असून नाटकांमुळे इतिहासाची मात्र अक्षम्य विकृती व हानी होते असे तेथे प्रतिपादन आहे, याचे दर्शन सूचीवरून होणे अवश्य आहे असे आम्हांस वाटते. ( ४ ) एक पानी निर्देशाची ही कथा तर अनेक पानी निर्देशांमुळे अभ्यासकाची अधिकच कुचंबणा होणार हे उघड आहे. चंद्रराव मोरे यांचे तीन संदर्भ आहेत. परंतु त्यांतील एकेठिकाणी महाराष्ट्रीयांना रक्तपात पाहण्याचा सराव असल्याने शिवकालीन संस्कृतीचा तो कसा एक विशेष होता हे सांगितले आहे. 'तुलादान' या हिंदु सोहळ्याच्या निमित्ताने अमर्याद एकछत्री राज्याबद्दल विवेचन केले आहे. 'देशमुखा'बद्दल अनेक निर्देश आहेत. त्यांत एके ठिकाणी समकालीन हाणामारी पुंडाव्यांच्या सर्रास अस्तित्वाबद्दल माहिती आहे. तर 'न्यायमूर्ती रानडे' यांच्याबद्दलच्या दहाएक निर्देशांपैकी एके ठिकाणी त्यांचे संतांबद्दलचे विवेचन प्रॉटेस्टंट धर्मपंथाच्या अनुकरणार्थ व आत्मप्रतिष्ठागौरवार्थ झालेले आहे असे निर्भीड प्रतिपादन आहे. हे महत्त्वाचे निर्देश पकडण्यास आहे ती सूची अक्षम ठरते. ( ५ ) त्याशिवाय मुख्य प्रतिपाद्य विषय जे शिवाजी,

शिवाजीचे कार्य, पार्श्वभूमी, व्यक्तिमत्त्व यांबद्दलचे यथार्थ दर्शन सूचीवरून होत नाही. तसे दर्शन सूचीवरून होणार नसेल तर ते एरवी कसे व्हावयाचे ? 'शिवाजी'च्या पुढे, 'संभाजी'च्या पुढे, 'शहाजी' पुढे फार मोठी आकड्यांची मालिका आहे ! यातील प्रत्येक मणी डोळे फाडून पाहिल्याशिवाय वाचक-हनुमानला त्यातील राम-शिवाजी गवसण्याची सोय करणे अवश्य होते. हे संपादनाच्या किंवा संकलनाच्या कोणत्याही शास्त्रशुद्ध दंडकांनी मना केलेले असेल असे आम्हांस वाटत नाही. एवढ्या वैभवशाली प्रकाशकाकडून एवढी अपेक्षा वाचकांनी अवश्य केली असली पाहिजे.

शेजवलकरांनी मराठ्यांच्या इतिहासाचा उत्तम व्यासंग केला आणि सुदैवाने आपली मते प्रकाशित करण्यामध्ये आळसही केलेला नाही. यामुळे त्यांच्या अभिप्रायाचा सूर सर्वसाधारणपणे माहीत आहे हे खरे असले, तथापि शिवचरित्राबद्दल सूक्ष्म चिकित्सापूर्वक प्रत्येक गोष्टीवर मत देण्याचा त्यांचा हा पहिलाच आणि प्रतिज्ञेचा प्रसंग आहे हे नाकारता येणार नाही. यामुळे त्यांच्या मताबद्दल साधारण निर्वाळा देऊन सूचिकारांना मुक्त होता येणार नाही. आमचे तर असे मत आहे, की शेजवलकरांच्या खास इतिहासविषयक सर्व लेखांचा एक संग्रह नव्याने तयार करून विशेष म्हणजे त्याबरोबर सर्वोत्कृष्ट विषयसूची जोडून तो संग्रह प्रकाशित केला जावा. हे काम केव्हा होईल ते होवो. परंतु प्रस्तुतापुरतेच बोलावयाचे म्हटले तर या ग्रंथातील जेवढ्या भागापुरती ही केवळ नामसूची तयार केलेली आहे, तेवढ्याच भागाची विस्तृत व मर्मदर्शी विषयसूची पुन्हा तयार करून शेजवलकरांच्या दुसऱ्या वर्षश्राद्धदिनी स्वतंत्र किंवा प्रस्तुत ग्रंथाची पुरवणी म्हणून उपलब्ध करून दिली जावी. व्यापक विषयसूचीशिवाय ग्रंथ हे या लोकशाही शतकातील प्रकाशकांनी एक प्रकारचे लांछन समजून ते कटाक्षाने टाळले पाहिजे. तशी मागणी वाचकांनी एकजुटीने करण्याची वेळ आता वास्तविक आलेली आहे. कंटक-सासवडकर हे दोघेही या कामी पुरेसे मुरलेले असल्यामुळे प्रकाशकांना याही बाबतीत विश्वासाने त्यांचे साहाय्य घेता येईल.

संकलकांना निःसंशय स्वातंत्र्य असलेली दुसरी बाब म्हटली म्हणजे आधारभूत ग्रंथांची यादी. ती इतकी व्यापक, विस्तृत आणि वर्गीकृत करण्याची कल्पना निःसंशय शेजवलकरांचीच असली पाहिजे. परंतु ती संकलित करण्यातील साक्षेपाचे श्रेय मुक्तहस्ताने श्री. कंटक यांना दिले पाहिजे. एवढी मोठी आणि इतकी तरी संपूर्ण यादी हीच पहिली लोकांपुढे येत आहे. यादीमध्ये सराईत अभ्यासकाच्या दृष्टीने अर्थात काही त्रुटी आहेत. त्यांचा निर्देश करावयाचा तर त्यात प्रामुख्याने प्रत्येक पुस्तकाच्या नावाबरोबर निदान पुस्तकाची आवृत्ती व प्रकाशन वर्ष आवर्जून देण्याबद्दल कटाक्ष बाळगण्यावर भर दिला पाहिजे. कित्येक ग्रंथांच्या खंडांची संख्या व प्रकाशकांची नावे गोळाबेरीज पद्धतीने दाखल केली आहेत. काही पुस्तकांची वर्गबदली व्हावी असे कोणी सुचवील. परंतु सर्वसाधारणांच्या उपयोगासाठी दिलेल्या यादीत एकही ओळ न वाढविता देता येण्यासारखा अवश्य असा सारा तपशील दिला पाहिजे. उदाहरणार्थ, जंत्र्यांचा निर्देश करावयाचा ठरविले तर खरे जंत्री शक १५५१ ते शक १६४९ पर्यंत तारखा देते व मोडकजंत्री शक १६५० पासून पुढच्या देते ही महत्त्वाची माहिती देण्यास हरकत असू नये. बहुधा एका खंडाच्या ग्रंथकाराचे नाव पाहण्याचे राहिल्यामुळे त्याच ग्रंथकाराच्या एकाच नावाचे व वर्णनाचे दोन खंड निरनिराळे दाखल झाले आहेत.तर दुसऱ्या एका शुद्ध मराठी पुस्तकाला मराठी नावाबरोबरच सरकारी प्रकाशनाच्या अटीप्रमाणे इंग्रजी नाव फक्त कापडी कव्हरावर व आतील नामपृष्ठावर छापले गेल्यामुळे ते पुस्तक एकदा मराठी नावाने मराठी यादीत तर दुसऱ्याने इंग्रजी पुस्तकांच्या यादीत असे दुबार छापले गेले आहे. केवळ अशाच याद्यांवरून ज्ञान संपादन करणाऱ्याची सोय चांगली झाली पाहिजे. म्हणूनच आणखीही काही वैगुण्ये दाखविता येण्यासारखी आहेत. 'महाराष्ट्र शब्दकोशा'चे कर्तृत्व चुकून अन्यकोशकाराकडे गेले आहे. ज्या पुस्तकावरून तीसपसतीस वर्षे अन्यांनी आपले ग्रंथ सजवले ते राजधानी रायगड हे चांगले पुस्तक वगळले गेले आहे. परंतु शेवटी ज्याने त्याने आपापल्या अभ्यासासाठी आपला स्वतंत्र पुस्तक संग्रह आणि टिपणांचा संग्रह करावयाचा असतो. जो पुस्तक स्वतः हाताळतो आणि ज्याचे निरीक्षण अचूक असते त्यालाही मग 'इतिहास व ऐतिहासिक' आणि 'रामदास व रामदासी' या समानशील मासिकांच्या नावातील उभयान्वयी अव्यय 'व' नसून 'आणि' हे आहे याची काटेकोर जाणीव होते. या गोष्टी क्षुल्लक वाटण्याकडे अलीकडे प्रवृत्ती होत आहे ती बरी नव्हे, हे पुन्हा पुन्हा नजरेस आणावे म्हणूनच एवढा प्रपंच केला. जे समर्थ असतील त्यांनाच सांगण्याचा उपयोग.

शेजवलकरांच्या स्वयंरचित मजकुराव्यतिरिक्त संकलकांनी तिसऱ्या भागात शेजवलकरांची काही टिपणे आणि चौथ्या भागात अनेक साधनग्रंथांतून शेजवलकरांनी सार काढून गोळा केलेली माहिती काही विषयवार पद्धतीने लावून छापून दिली आहे. अशा तऱ्हेची कितीतरी माहिती प्रत्येक साक्षेपी लेखक आपले लिखाण भरीव होण्यासाठी एकत्र करून वापरतो. इतिहासात कालदर्शन म्हणजे सांगाडाच. तेव्हा काटेकोर कालानुक्रम सिद्ध करणे ही इतिहासकारावर फार मोठी जबाबदारी असते. ती पार पाडण्यासाठी शहाजीच्या हालचाली व शिवचरित्रोपयोगी घटना यांचे कालानुक्रमे वर्णन गोळा करूनच शेजवलकर थांबले नाहीत. तर त्यांनी शिवाजी महाराजांच्या आयुष्याचा एक विस्तृत कालपट १४ पाने तयार केला आहे. या जगात जिवंतपणी महाराजांनी १९ फेब्रुवारी १६३० पासून ३ एप्रिल १६८० पर्यंत एकूण १८३०६ दिवस काढले. आणि त्यापैकी त्यांचे कोकणात ३४४२ दिवस गेले, देशावर १३६७० दिवस गेले आणि महाराष्ट्राबाहेर ११९४ दिवस त्यांना घालवावे लागले. यापैकी प्रत्यक्ष स्वारी-मोहिमांत त्यांचे २०५२ दिवस खणाखणीचे गेले, असाही त्यांनी हिशेब करून दाखविला आहे. या पद्धतीला संकलनकार कंटक यांनी "ऐतिहासिक गणिती पद्धती" म्हणून यथार्थतेने गौरविले आहे. अचूकपणाबरोबर शब्दमाध्यमात वर्णिलेल्या घटकांना दृश्य स्वरूप येण्यासाठी अनेकांनी ऐतिहासिक घटनांना रेखाचित्रांचे वा आलेखाचेदेखील स्वरूप दिल्याचे आढळते. अलीकडे ज्ञानसागर अमर्याद वाढत आहे. त्याचे वर्गीकृत संकलन करण्यास सोयीची म्हणून चिठ्ठीपद्धती ( कार्ड सिस्टीम ) बहुतेक चोखंदळ विद्वान वापरतात. आपले सुदैव असे की, शेजवलकरांनी गोळा करून साठविलेले हे संदर्भधन एरवी वाया गेले असते. ते अन्य अभ्यासकांना आयते उपलब्ध झाल्यामुळे त्यांचे व भावी चरित्रकाराचे कितीतरी परिश्रम वाचणार आहेत. शेजवलकरांच्या या नोंदी स्थलानुक्रमे, व्यक्तिनामानुक्रमाने, कालानुक्रमाने अशा विविध पद्धतीने, आणि मुसलमान सरदारांची माहिती, शिवाजीची कौटुंबिक माहिती, शिवाजीचे व्यक्तिमत्त्व विशद करून सांगण्यासाठी उपयुक्त माहिती, अशा निरनिराळ्या विषयानुसार लावलेल्या आहेत. यावरून त्यांनी आपल्या वर्ण्यविषयांचा प्रपंच किती पद्धतशीर आणि काटेकोरपणे करण्याचे योजिले होते याचा पुरावा मिळतो. ही सारी साधने गोळा करतानाच आणि त्यांच्याबरोबरच त्यांनी फेर विचारासाठी शंकास्थाने नमूद केली आहेत. पूर्वलेखकांच्या अभिप्रायांतील चुका दाखवून मतभेद प्रकट केले आहेत. आणि या साऱ्या गोष्टींवर साधकबाधक चर्चा करूनच ते आपले अखेरचे विचार प्रकट करणार होते, यांत प्रस्तुत संग्रहातील त्यांच्या प्रतिपादनाची शैली पाहिली असता काही शंका राहात नाही. या संकलित माहितीत पुष्कळच भर पडावयास हवी आहे. चरित्रलेखन पुरे होई-पर्यंत पडणारच होती. शेजवलकरांचा अखेरचा हात न फिरल्यामुळे यात किरकोळ वैगुण्ये असतीलही; पण केवळ एका वेळच्या सुग्रास अन्नग्रहणार्थ निमंत्रणाने स्वतःला कृतकृत्य मानणाऱ्यांनी, समारंभ उध्वस्त झाल्यामुळेच केवळ यदृच्छेने ( येथे उदार प्रकाशकाच्या कृपेने ) इतकी समृद्ध कोठी लुटण्याची प्राप्त झालेली संधी कृतज्ञतेने राव-विण्यास हरकत नाही. आपल्या अभ्यासाला भरीवपणा आणण्यासाठी या खच्चून भरलेल्या सामग्रीचा अनेकांना खात्रीनेच उपयोग होईल.

शेजवलकरांचा संपूर्ण ग्रंथ आपल्यासमोर आला असता तर अशा प्रकारच्या नोंदीची दखल घेण्याची आवश्यकता असताही आवर्जून तशी संधी घेण्याचा प्रसंग आला नसता आणि मग इतर वादग्रस्त प्रश्नांचा परामर्ष घेण्याच्या घणाघाईत आपल्या इतिहासलेखनातील एक महत्त्वाचे वैगुण्य आणि त्याच विशिष्ट क्षेत्रातील शेजवलकरांचे वैशिष्ट्यपूर्ण सामर्थ्य कदाचित कायमचे अलक्षित राहण्याचा संभव होता. मागील परिच्छेदातील वर्गीकृत विविधांगी टिपणांचे महत्त्व चाकोरीतील इतिहासाला व त्याच प्रकारच्या वाचकाला सहज पटणारे असेच आहे. परंतु त्यांच्या या नोंदीपैकी बत्तीस पानी 'संकीर्ण' आणि अकराच पानी छोटासा 'राज्यकारभार' हे दोन अखेरचे विभाग फार फार महत्त्वाचे आहेत. संकीर्णामध्ये त्यांनी शिवाजीच्या तोफखान्यासंबंधी, पदरच्या परकी सेवकासंबंधी, 'राजमंडळ' सारख्या शब्दाच्या प्रथम निर्देशासंबंधी, कलकत्ता हे शहरनाम व पारशी स्त्रियांसंबंधी काही साधनात उपस्थित झालेला प्रथम उल्लेख यासंबंधी, शिवाजी स्वतःला काही रूढ बिरुदे लावून घेतो किंवा कसे, इत्यादी क्षुल्लक दिसणाऱ्या परंतु अनेकविध तर्कांना अवसर देणाऱ्या गोष्टींच्या चौकशीचा पसारा मोठ्या आस्थेवाईकपणे मांडलेला दिसेल. या संग्रहातील विचार तेच सर्वप्रथम करणार होते असे नव्हे. हे व असले विषय

पूर्वी अनेकांनी कमीअधिक समर्थपणे इतर संदर्भात हाताळलेले होते याची दखल त्यांनीच जेथल्या तेथे नमूद केलेली आढळेल. या सर्व गोष्टींचा साकल्याने एकत्र विचार करून मगच आपले मत बनवून ते मांडण्याची त्यांची चिंता त्यांच्या या प्रपंचावरून स्पष्ट होते. शिवाजीच्या कारभारविषयक चर्चेमध्ये आजपर्यंत अनेक पूर्वग्रहांची विनाकारणच लुडबूड झालेली आहे. एकतर ती अजीबात विवेचनातून वगळावी, नाहीतर सारे पुरावे विचारात घेऊन यावच्छक्य काहीतरी समर्पक सिद्धान्त मांडावे, असे दोनच मार्ग अभ्यासकापुढे असतात. यांपैकी दुसरा मार्ग पत्करण्याची शेजवलकरांनी तयारी दाखविणे अवश्य होते आणि त्या प्रमाणात आपल्या अभ्यासाचा आवाका त्यांनी केवढा आखला होता, हे परिचितांना प्रत्यक्षात माहिती नव्हते असे नाही. तथापि त्यांचे काही दृश्य प्रत्यंतर प्रकाशकांनी पुढे ठेवल्यामुळे, महाराष्ट्रेतिहासाच्या भावी अभ्यासकांपुढे एक नवा आदर्श सुस्पष्टपणे उभा राहिला आहे. या आदर्शाचा उपयोग पुढे कसा आणि कितपत होईल हे दिसून येईलच.

यापुढील शेवटचा परिशिष्टांचा भाग. यातील बासष्ट पाने शेजवलकरांच्या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या पाच मराठी आणि तीन इंग्रजी लेखनांच्या पुनर्मुद्रणासाठी दिलेली आहेत. ज्या लेखांतील शेजवलकरांचे महाराजांसंबंधीचे विचार आयुष्याच्या अखेरीसही कायम राहिले होते तेवढेच लेख निवडण्याची काळजी घेतली आहे असे श्री. कंटक सांगतात. अनेक व्यवहारी कारणांमुळे हा निर्णय समर्थनीय वाटेल आणि निवडलेले एवढे तरी लेख शेजवलकरांच्या इतर निवडक सामग्रीबरोबर वाचकांना उपलब्ध झाले याबद्दल सर्वसाधारण इतिहासप्रेमी वाचक केव्हाही कृतज्ञच राहील. परंतु दुसऱ्या एका दृष्टीने विचार करता ज्यामध्ये शेजवलकरांचे शिवाजीबद्दलचे ग्रह त्यांच्या परिपक्व दशेतील विचाराहून भिन्न होते असे श्री. कंटक यास वाटले, तेही लेख याबरोबरच छापण्यामध्येही एकप्रकारचे औचित्य होते. एक तर आमच्या मते तसे लेख फार राहिलेले नाहीत आणि दुसरे असे की, शेजवलकर आपली मते कशी बनवितात आणि एकदा बनवून व्यक्त केल्यानंतरही निराळ्या पुराव्याच्या अभ्यासाने कशी म्हणजे का बदलतात याचेही दिग्दर्शन विचारवंतांना झाले असते.

असे आम्ही का म्हणतो याचा प्रपंच येथे थोडक्यात तरी करणे अवश्य झाले आहे.

अलीकडे शेजवलकरांचा हा अपुरा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यामुळे शेजवलकरांच्या काही मतांवर काही गंभीर व काही गमतीदार टीका करण्यास काही लोक सरसावलेले दिसतात. यापूर्वीही शेजवलकरांवर विविध प्रकारे गहजब झाला नाही असे नाही आणि शेजवलकरांच्या निर्भीड प्रतिपादनात संपूर्ण ऐतिहासिक आधारांवर उभारलेल्या सिद्धान्ताच्या बरोबरीने कित्येक वेळा त्यांच्या अयशस्वी व्यावहारिक जीवनातील कटू अनुभवामुळे गडद विषण्णतेने अतिरंजित झालेले पूर्वग्रह मिसळलेले आढळतात याबद्दल शंका नाही. पण हे पूर्वग्रह केव्हाही सहज वेगळे काढून वगळता येण्याइतके उघड असतात. आणि ते एकदा वगळले म्हणजे मग मागे राहते ती समाजाच्या सर्वांगीण उन्नतिप्रगतीच्या योगक्षेमाची तळमळ आणि चिंता राजवाड्यांच्यानंतरच्या पिढीत जन्मलेल्या या इतिहासचिंतकाने राजवाड्यांच्या लेखनाच्या चिंतनमननामुळे नकळत राजवाड्यांच्या नमुन्यावर आपले चिंतन व लेखन बेतलेले दिसते. काही बाबतीत प्रत्यक्ष इतिहासपटाच्या निर्मितीपेक्षा स्वदेशाच्या इतिहासाला भलेबुरे वळण देणाऱ्या अंतःप्रवृत्तीचा मागोवा घेणे, त्या दृष्टीने ऐतिहासिक घटनांचे चिरंतन शाश्वत मूल्यांच्या प्रकाशात विश्लेपण करणे आणि त्यावरून काही निश्चित मार्गदर्शन करण्याची वा स्वीकारण्याची पात्रता स्वजनात उत्पन्न करणे, असे काही सैद्धान्तिक स्वरूपाचे कार्य आपल्या बुद्धीकडून करून घेण्याची या दोघांची महत्त्वाकांक्षा स्पष्ट दिसते. दोघांची तुलना सुचविताना दोघेही सर्वस्वी तुल्यबल होते असे ध्वनित करण्याचा आमचा मानस नाही. पण पंथ-दृष्ट्या आणि मूल्यमापन करण्याची दिशा शोधून काढण्याला उपयोगी म्हणून उभयतांचे अंशतः साधर्म्य दर्शविले आहे. शेजलवकरांशी प्रत्यक्ष संभाषण करताना त्यांच्या प्रकृतीविषयक व किरकोळ इतर अप्रिय बाबींचा तोंडावरील शेवाळ एकदा बाजूला झाला म्हणजे संभाषणाचा ओघ निश्चित मार्गावर येई आणि मग अस्खलित, साधार, शुद्ध आणि शास्त्रीय विवेचनात त्यांची वाक्गंगा स्वैरपणे विहरत राही याचे काहींना तरी स्मरण असेल.

शेजवलकरांचा बहुतांश कल आणि कौल इतिहासप्रधान होता. त्यांची आवड व वाचन, त्यांचा एम्. ए. साठी नाकारलेला प्रबंध, पण त्यानंतर थोड्याच वर्षांत रियासतकारांच्याच संमतीने त्यांच्या 'नानासाहेब' या ग्रंथाला जोडलेली विद्वद्मतप्रतिपादक प्रस्तावना, त्यांचे 'प्रगती'चे

संपादन, डेक्कन कॉलेजातील प्राध्यापकत्व, त्या कालातील नागपूरकर भोसल्यांच्या पत्रांचे प्रकाशन, 'पानिपत' व 'निजामपेशवे संबंध' या विषयावरील पुस्तके आणि 'कोकणच्या इतिहासाची पार्श्वभूमि' हा प्रतिभाशाली निबंध—ही सारी वाचक, अभ्यासक, संपादक, संशोधक, प्राध्यापक, संशोधकमार्गदर्शक, ग्रंथकार आणि शास्त्रीय विमर्शक इत्यादी विविध प्रकारे इतिहासाच्या त्यांनी केलेल्या अनन्य सेवेची आणि इतिहासाच्या एक भाष्यकार म्हणून क्रमशः मिळविलेल्या पात्रतेची गमके म्हणावी लागतील.

तुलना करणे अनेक वेळा अप्रिय वाटते; परंतु शिवाजींच्या चरित्रलेखनाचे काम अंगावर घेणारे अगदी अलीकडील इतिहासकार म्हणून ज्या मालिकेत शेजवलकरांना बसवावे लागेल त्या मालिकेतील त्यांचे स्थान केवळ कालानुक्रमानेच नव्हे, तर कालमानामुळे साध्य होणाऱ्या साधनांच्या व अन्य प्रकारच्या समृद्धीमुळे उजवे गणणे क्रमप्राप्त आहे. आद्य इतिहासकार ग्रँट् डफ आणि त्याच्या प्रतिवादार्थ सिद्ध झालेले देशभक्त चरित्रकार हे दोन अशास्त्रपंथ सोडले, तरी आधुनिक इतिहासपरिपाठीचा स्पर्श अनुभवलेले विसाव्या शतकातील राजवाडे-रानडे, सरकार-बाळकृष्ण-सरदेसाई आणि आपटे-मंडळ असे तीन प्रकारचे अभ्यासगट दिसतात. ही सारी मोठी माणसे होती. त्यांना उपलब्ध असलेल्या साधनसामग्रीत आता अनेक प्रकारे भर पडलेली आहे, ही गोष्ट निखालस शेजवलकरांच्या बाजूची होती. पण त्याशिवाय डोबळ मानाने असे म्हणता येईल की राजवाड्यांची 'आकांक्षा' फक्त पत्रसंग्रहाची होती. रानड्यांनी उपलब्ध झालेल्या अन्य समाजाच्या साच्यात आपला इतिहास बसविण्याचा प्रयत्न केला, आणि फक्त उदयाची मीमांसा करून ते थांबल्यामुळे अवनतीच्या समस्येतील खाचखळग्यांची दखल त्यांना घ्यावी लागली नाही. सरकारांचा आवाका मोठा आणि वाचकवर्गही मोठा; परंतु प्रामुख्याने मुसलमानी साधनांवर विसंबून ते एकदा विरोधी भावना करून बसले ती बाचकत पुढे दुरुस्त करूनदेखील· सर्व साधनांचा डाव उघडा मांडून दाखविण्याचे व प्रांजलपणे महाराष्ट्रीय वाचकांचे समाधान करण्याचे त्यांना जमले नाही. डॉ. बाळकृष्ण यांनी इंग्रजी साधनांचा फार मोठा प्रपंच बहुत द्रव्य वेचून केला. परंतु ह्या भावनिक वीरपूजकाला मराठी वगैरे साधनांचे हद्गत हस्तगत होणे कठीण होते सरदेसायांची कामगिरी काहीशी परप्रत्ययनेय वाटे; त्यांच्या अफाट साक्षेपात शास्त्रीय वा सैद्धान्तिक दमदारपणा प्रत्ययास आला नाही. आपटे-मंडळाची बैठक निरपवाद खरी, परंतु त्यांच्याही उद्योगाला वीस वर्षे होऊन गेली. मधला सारा काळ आम्हांला अनुत्पादकच राहिला. तेव्हां सर्व आधुनिक साधनसामग्री व आधुनिक शास्त्रीय पद्धती यांचा उपयोग करून शिवाजीचे चरित्र लिहावयाचे तर दीर्घकालीन साधना, अव्यभिचारी निष्ठा आणि निर्भीड, शास्त्रीय व व्यापक दृष्टिकोण बाळगणाऱ्या शेजवलकरांची निवड होणे अपरिहार्य होते.

आणि म्हणूनच त्यांच्या विधानावर केवळ प्रतिवादात्मक वा उथळ मूर्तिभंजकाच्या अभिनिवेशाने वृत्तपत्री टीका करून भागणार नाही. शिवाजीबद्दल योग्य तेवढाच नव्हे तर जाज्वल्य अभिमान बाळगूनही पुराव्याने सिद्ध होणाऱ्या वास्तवतेच्या अनुरोधाने कित्येकांच्या मनांतील अवास्तव कल्पनांना धक्का देणारे प्रतिपादन शेजवलकरांनी केले, तर लगेच शिवाजीचे व्यक्तिमत्त्व भंगले असे काहूर उठविणे रास्त होणार नाही. यासाठी शेजवलकरांच्या सर्वच ऐतिहासिक लिखाणाची संपूर्ण आणि शक्य तर सटीक, समूचिक आवृत्ती छापवून त्यातील विधानांची पुराव्याच्या दृष्टीने छाननी झाली पाहिजे. शेजवलकरांच्या अप्रिय वाटणाऱ्या प्रमुख सिद्धान्तांची पुराव्याच्या आधाराने निःपक्षपाती छाननी कोणीतरी एकदा करून पाहणे अवश्य आहे असे वाटते. पाश्चात्त्य देशातील समृद्धी आपल्याकडे आजच आपण अपेक्षित नाही. तरीदेखील शिवाजीसारख्या युगपुरुष मानल्या जाणाऱ्या महान व्यक्तीबद्दल भरीव सामग्रीचा एखादा नमुनेदार संग्रहही कोठे उपलब्ध नाही. शिवाजीच्या पुढील कालाबद्दल सामग्री जराशी अधिक उपलब्ध आहे, याचा अर्थ या सर्व ऐतिहासिक पुरुषांबद्दल लेखकांची व पुस्तकांची समृद्धी असून त्यांचे संपूर्ण संग्रह राष्ट्रीय अगर सार्वजनिक ग्रंथालयात लोकांना सहजसाध्य आहेत असे नाही. यामुळे इतिहास हा विषय सर्वांनाच माहीत असतो असे अनेकांना उगाचच वाटत राहते; तथापि त्याचे खरे मर्म कोणते याबद्दल अनेक उथळ आणि असमर्थनीय समज सदिच्छेने पण अनवधानाने केलेल्या प्रतिपादनामुळे फैलावत राहतात. त्यांना प्रतिबंध करण्याचे एकमेव साधन म्हणजे प्रस्तुत ग्रंथासारखी प्रकाशने. इतिहासातील अशी अनेक प्रकाशने आणि कित्येक पुनर्मुद्रणे अत्यंत तातडीने झाली पाहिजेत. इतिहास या महत्त्वाच्या विषयाला अलीकडे मंदी आल्याची दुश्चिन्हे दिसत आहेत. अशा वेळी स्वराज्य आल्यानंतर सुमारे १५ वर्षांनी प्रसिद्ध होणारा हा शिवभूपालाबद्दलचा ग्रंथ भावी उत्कृष्ट प्रकाशनांचा अग्रदूत ठरावा अशीच कोणाचीही इच्छा असणार. प्रकाशकांनी एका पत्रकात शेजवलकरांचे 'अपूर्ण शिवभारत' असे नाव या प्रकाशनाला दिले आहे. हे अपूर्ण शिवभारत कोणा तरी अधिकारी व्यक्तीकडून पुरे होण्याची विवंचना सर्वांनाच लागून राहिली आहे. यांतूनच पुढे शिवकोश, शिवाजी विश्वकोश, महाराष्ट्रेतिहास कोश, महाराष्ट्रेतिहास विश्वकोश, 'शिवचरित्र कार्यालय' अशा कल्पना साकार व सशक्त होण्याची आकांक्षा इतिहासप्रेमी महाराष्ट्राने का धरू नये?

प री क्ष ण

# प्राचीन मराठी कोरीव लेख

डॉ. शं. गो. तुळपुळे यांचा 'प्राचीन मराठी कोरीव लेख' हा प्रचंड ग्रंथ म्हणजे त्यांच्या एक तपाच्या तपश्चर्येचे गोमटे फळ आहे. महाराष्ट्रात उपलब्ध झालेल्या शिलालेखांचे आणि ताम्रलेखांचे हे एक अत्यंत साक्षेपी संपादन आहे. या समग्र संपादनाचा उद्योग आणि व्याप पाहून मन खरोखरच चकित होऊन जाते. अनेकविध शास्त्रांमधील गति, तांत्रिक कुशलता, योजनाबद्ध आखणी, अभियुक्त आणि वास्तव दृष्टिकोण, कानामात्रानुस्वारांपर्यंतचा यावच्छक्य वारकावा, व्यापक सहृदयता, शाखोपशाखांचे वाचन अशा कितीतरी गुणांमुळे हा ग्रंथराज म्हणजे पुणे विद्यापीठाचे एक महाभूषण आणि स्वतः डॉ. तुळपुळ्यांच्या महोद्योगाचे एक चिरंतनचे स्मारकच समजावा लागेल. शिलालेख-ताम्रलेख हा विषय, त्यांची साधनसामग्री, ज्ञानसंभार, या सर्वांची आखबंद मांडणी, पाठचर्चा, भाषाविषयक सूत्र, शब्दसूची, विषयसूची, शिलालेखांचे ठसे आणि या सर्वांचे ज्ञानकोशाच्या आकाराचे स्वच्छ मुद्रण म्हणजे केवढा व्याप असतो, हे त्याच्या वेशाला गेल्यावाचून कळणार नाही! त्यामुळे अशा प्रकारच्या या महाग्रंथाच्या संपादकाला डी. लिट. ही पदवी देणे हे खरोखर सत्पात्री दान म्हणावे लागेल, यात शंका वाटत नाही.

हे झाले ग्रंथाचे सर्वसाधारण स्वरूप आणि त्याची योग्यता यांविषयी. प्रस्तुत ग्रंथात शिलालेख आणि ताम्रलेख यांची संख्या एकूण ७६ आहे. पैकी ६६ शिलालेख आणि १० ताम्रलेख आहेत. प्रस्तुत १० ताम्रलेखांपैकी ४ ताम्रलेखांचे स्वरूप संशयास्पद आहे. अर्थात ताम्रलेखांचे एकंदरीने प्रमाण फारच कमी आहे. परंतु शिलालेखांच्या भूगोलाची व्याप्ति आणि कालाचा पल्ला ही लक्षात घेतली, तर शिलालेखांचेही प्रमाण तसे मोठे ठरत नाही. या कोरीव लेखांच्या उपलब्धिस्थळांचा जो एक नकाशा दिला आहे, त्यावरून दिसते की, दक्षिणेकडे म्हैसूर-प्रांतातील श्रवणबेळगोळ येथून उत्तरेकडील नांदगाव-धाराशिवापर्यंत, आणि पश्चिमेकडील सर्व कोकणपट्टीपासून पूर्वेकडच्या मराठवाड्यातील मार्कंडी कान्हेगावापर्यंत हे संपादित कोरीव लेख विखुरलेले आहेत. आजच्या महाराष्ट्राच्या राजकीय सीमांपेक्षा या सीमा अधिक आहेत, याचे कारण त्या लेखांची मराठी भाषा. अर्थात ही मराठी भाषा निखळ मराठीपासून नाममात्र मराठीपर्यंत भेद पावलेली आहे. एकंदरीने या कोरीव लेखांच्या बाबतीत मराठीला थोडे अंग चोरूनच बसावे लागलेले आहे. ते कसे, त्याचीही वास्तव चिकित्सा ग्रंथात आहे. प्रस्तुत कोरीव लेखांची कालमर्यादा शके ९३४-पासून पुढे सुमारे ४०० वर्षांपर्यंतची आहे. डॉ. मिराशी यांच्या मतानुसार पाहता तुळपुळ्यांनी वाचलेला आरंभशक वादग्रस्त आहे. डॉ. मो. गं. दीक्षितांच्या मताप्रमाणे हा शक ११३२ असा आहे. तुळपुळे आणि दीक्षित यांच्या मतांमधील कालांतर जवळ जवळ २०० वर्षांचे आहे. शिलाहार केशिदेवाच्या लेखाचा दीक्षितांचा काल घटकाभर मान्य केला, तरी कालाची व्याप्ति २०० वर्षांची ठरते. हीही अल्प नाही.

या संग्रहातील सर्वच कोरीव लेख नवीन संपादिलेले आहेत, असे नाही. पण २५ कोरीव लेखांच्या संपादनाचे श्रेय डॉ. तुळपुळ्यांना आहे. म्हणजे या २५ कोरीव लेखांच्या अभ्यासाचा समावेश या ज्ञानशाखेत प्रथम होत आहे. या लेखांच्या संपादनाची चर्चाचिकित्सा संशोधकांना यथाकाल करावी लागेल, आणि तुळपुळ्यांचे निष्कर्ष किती टिकतात, तेही ते सांगतील. तथापि एवढा मोठा ज्ञानसंभार विद्याशाखेत आणून सोडणे हे कार्य फार मोठे आहे, हे खरे.

प्रस्तुत लेखांमध्ये आणखी एका कोरीव लेखाचा समावेश करणे योग्य ठरले असते, असे वाटते. तो लेख म्हणजे तामिळनाडमधील तंजाऊरच्या बृहदीश्वराच्या देवालयामधील अवाढव्य शिलालेख. भोसल्यांच्या बखरीप्रमाणे असलेला हा शिलालेख म्हणजे मराठी भाषेच्या आणि इतिहासाच्या

---

प्राचीन मराठी कोरीव लेख :
संपादक : शं. गो. तुळपुळे : पुणे
विद्यापीठ-प्रकाशन : मूल्य रु. ५०/–

अभिमानाचा विषय ठरावा, असा आहे. हा कोरीव लेख डेमी आकाराची १०२ पृष्ठे भरतील एवढ्या प्रचंड विस्ताराचा असल्याने त्याचा अतिमहाविस्तार हेच त्याचा येथे समावेश न करण्याचे एक कारण असावे. (शिवाय, तो अलीकडला म्हणजे १८०३–च्या डिसेंबरातील आहे.) कारण समावेशापाठोपाठ त्याचा सर्वांगीण परामर्शही आलाच. नहून, या तंजाऊरच्या बखरीचा समावेश हे ग्रंथाचे एक फारच मोठे वैशिष्ट्य ठरले असते.

मूळ कोरीव लेखांचे ठसे हे एक अत्यावश्यक अंगही येथे आढळून येते. त्यायोगे लेखाचे वाचन कसे केले आहे, आणि ते कितपत ठीक आहे, याचा वाचकाला आणि संशोधकाला यथावत पडताळा पाहता येतो. मात्र हा पडताळा कोणालाही पाहता येईल, इतका सोपा नाही. अक्षरवटिका, इतिहास, तिचे वळण, भाषा, सवय, उपस्थिती यांचे ज्ञान असल्यावाचून हा पडताळा पाहता येणार नाही. परंतु हे ठसे आणि त्यांचे प्रतिसंवादी (corresponding) पाठ पाहणे व त्यांची अवतीभवतीची चर्चा-चिकित्सा वाचणे हे फारच उद्बोधक आहे, यात शंका नाही. मराठी भाषेचे कालिक स्वरूप, शब्दसंपदा, व्याकरण, ऐतिहासिक संदर्भ, सामाजिक माहिती, देवदैवतांचे निर्देश, कलह–कलगती, शासनव्यवस्था, आर्थिक व्यवहार, कायदा, धर्म, चालीरीती अशा कितीतरी गोष्टींचे रेखीव ज्ञान वाचकाला व्हावे, आणि अन्य संशोधकांचे तद्विषयक इतर सर्व निर्देशही अवगत व्हावे, अशा पद्धतीने डॉ. तुळपुळ्यांनी प्रस्तुत संपादन केले आहे. त्यात अर्थातच खंडनमंडन आले आहे. ते येणारच. कारण अक्षराच्या एखाद्या वळणापासून कोरीव लेखाचा काल आणि आशय या प्रत्येक बाबतीत मतभेद संभवतो. विशेष हे की, अशा खंडनमंडनातही संपादकास या मतभिन्नतेची जाणीव असल्यामुळे त्यात एक प्रकारचा अनाग्रही रेखीवपणा सामान्यतः प्रत्ययाला येतो.

प्रस्तुत ग्रंथाला असलेली १३० पृष्ठांची प्रदीर्घ, भरदार प्रस्तावना आणि प्रा. कुमुदिनी घारपुरे यांचा 'मराठी कोरीव लेखांतील पद्यरचना' हा लेख हे वैशिष्ट्यपूर्ण भाग होत. प्रस्तावना तर अत्यंत उद्बोधक आहे. ज्यांना खास शिलालेखांच्या वा ताम्रलेखांच्या वाचनात रुची नाही, त्यांनी ही प्रस्तावना अवश्य वाचावी, अभ्यासावी, अशा योग्यतेची ती आहे. तीत कोरीव लेखांची सर्वांगीण चर्चा केलेली आहे. कोरीव लेखांच्या अभ्यासाचे महत्त्व, त्यांची साधने, त्यांची सत्यासत्यता, प्रकार व योजना, साधने, त्यांच्या अभ्यासाचा इतिहास, उपलब्धिस्थळांची चिकित्सा, आकार, अक्षरवटिका, मोडी लिपी, कालनिश्चय, आद्यंतांचे विशेष, शापोद्गार, लेखक व कोरक्ये, भाषा, लेखनविशेष, अक्षरांची मोड, राजवटी, विषय, शासनपद्धती, परिभाषा, सामाजिक जीवन, आर्थिक व्यवहार, कुटुंबपद्धती, धार्मिक जीवन, देवदवते, देवालयांचे प्रकार, स्थलव्याप्ती, स्थल-नामविचार इत्यादी कितीतरी गोष्टींची घासूनपुसून चर्चा केली आहे; अनेक रूढ अपसमजांचे निराकरण केले आहे. मराठी लेखांत संस्कृताचे प्रमाण कसे प्रभावी असते, लेखांची भाषाही कशी अशुद्ध असते, महाराष्ट्रासारख्या "दगडांच्या देशा"त शिलालेखांचे प्रमाण किती अल्प आहे, संशोधकांच्याही गमतीदार चुका कशा घडतात, इत्यादी गोष्टी जशा मौजेच्या तशा विचारणीयही आहेत.

एक गोष्टीचा उलगडा होत नाही. ग्रंथाच्या शब्दसूची-मध्ये जे शब्द दिलेले आहेत, ते अनेक ठिकाणी पदरूपाने दिले आहेत; म्हणजे त्यांची सविभक्तिक रुपे दिलेली आहेत. असे का? मूळ शब्द का दिले नाहीत? पदरूपे देण्याचे प्रयोजन काय? पदरूपे देण्याने त्यांच्या व्याकरणाचा उलगडा होत नाही. शिवाय, त्यातील कित्येक शब्दांची मूळरूपे अगदी सुगम आहेत. ती देण्यात कठीण-पणाही काही नव्हता. शिस्त या दृष्टीने हे आवश्यक होते, असे वाटते. बरे, ती केवळ सूची आहे, असे म्हणावे, तर तीत शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. परंतु हा मुद्दा दूर टेविला, तरी मराठीमधले या जटिल विषयावरचे इतके मोठे व इतके काळजीने संपादिलेले असे हे पहिलेच पुस्तक आहे, त्यामुळे डॉ. तुळपुळ्यांची ही निर्मिती निःसंशय अभिनंदनीय आहे.

—अरविंद मंगरूळकर

## परिषदेचा हीरक महोत्सव

महाराष्ट्र साहित्य परिषदेस सन १९६६ मध्ये ६० वर्षे पुरी होत आहेत. याच वर्षी कविवर्य केशवसुत यांची जन्मशताब्दी येते.

त्याचप्रमाणे म. सा. प. चे भौगोलिक कार्यक्षेत्र यापुढे कारवार, बेळगाव, गोवा व पश्चिम महाराष्ट्राचे बारा जिल्हे यापुरतेच मर्यादित झाले असल्यामुळे अखिल महाराष्ट्रीय स्वरूपाचे साहित्य संमेलन भरविण्याची जबाबदारी आता मराठी साहित्य महामंडळाकडे गेली आहे. स्वाभाविकच मुंबई, विदर्भ व मराठवाडा यांची प्रादेशिक साहित्य संमेलने प्रतिवर्षी आयोजित केली जातात त्याप्रमाणेच यापुढे महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या वतीने या बारा जिल्ह्यांचे व कारवार, बेळगाव, गोवे या विभागाचे एक संमेलन प्रतिवर्षी भरविणे क्रमप्राप्त झाले आहे. त्यादृष्टीने या वर्षीचे पहिले संमेलन वरील दोन कार्यांना जोडून पुणे येथेच भरविल्यास इष्ट होणार आहे.

वरील तिन्ही बाबतीत परिषदेच्या सभासदांना काही सूचना करावयाच्या असल्यास त्यांनी त्या परिषदेच्या चिटणिसाकडे पाठवाव्यात.

**—चिटणीस**

## वर्गणीदारांना सूचना

परिषदेच्या वार्षिक वर्गणीदारांनी घटनेप्रमाणे आपापली वर्गणी ३० जून १९६५ चे आत भरावी लागते याप्रमाणे जे वर्गणी भरतील त्यांनाच पत्रिकेचा अंक नियमितपणे देण्याची खात्री देता येते. बऱ्याच जणांकडून वर्ष होऊन गेल्यावरही वर्गणी येत नसल्याने अंकाच्या प्रती जास्त काढल्याने परिषदेचे नुकसान होत आहे. तरी विनंती की सभासदांनी आपापली वर्गणी बाकी व सन १९६५ ची वर्गणी सत्वर पाठवून द्यावी व आपला पत्रिकेचा अंक नियमितप्रमाणे मिळण्याची व्यवस्था करावी.

येते साहित्य संमेलन हैदराबाद येथे सन १९६५ च्या डिसेंबरमध्ये भरणार आहे. परिषदेच्या भौगोलिक विभागातील ज्या प्रतिनिधींना या संमेलनास जावयाचे असेल त्यांनी परिषदेचे सभासद असावयास पाहिजे असा आता साहित्य महामंडळाचा नियम झाला आहे. तरी इच्छुकांनी रु. ५ वार्षिक वर्गणी भरून परिषदेचे सभासद व्हावे.



## 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या मालकी-संबंधीच्या माहितीचा तक्ता

**( नियम ८, फॉर्म ४ ) प्रमाणे नियम १९५६—**

१ प्रकाशनस्थळ—टिळक रस्ता, पुणे २.

२ प्रकाशनकाळ—त्रैमासिक ( एप्रिल, जुलै, आक्टोबर व जानेवारी )

३ मुद्रकाचे नाव—द. वा. आंबेकर

राष्ट्रीयत्व—भारतीय

पत्ता—आर्यभूषण मुद्रणालय, पुणे ४

४ प्रकाशकाचे नाव—वि. त्र्यं. शेटे, चिटणीस महाराष्ट्र साहित्य परिषद

राष्ट्रीयत्व—भारतीय

पत्ता—टिळक रस्ता, पुणे २.

५ संपादकाचे नाव—श्री. के. क्षीरसागर

राष्ट्रीयत्व—भारतीय

पत्ता—महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे २.

६ मालक संस्थेचे नाव व पत्ता—महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे २.

मी, विश्वनाथ त्र्यंबक शेटे, चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद, प्रकट करतो की, वरील तपशील, माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे बरोबर आहे.

( सही ) वि. त्र्यं. शेटे
प्रकाशक

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे २

## सन १९६४–६५ चे इतिवृत्त

**सभासद-संख्या**—गेल्या वर्षी परिषदेची सभासद-संख्या पुढीलप्रमाणे होती— उपकर्ते २, आश्रयदाते ५, सहाय्यक ८, हितचिंतक २३, तहह्यात ५६६ व साधारण ७९०—एकूण १३९४. चालू वर्षात ही संख्या स्थिर आहे. हितचिंतक व तहह्यात वर्गापैकी काही व्यक्ती निधन पावल्यामुळे तहह्यात सभासद संख्या तेवढ्याने कमी झाली आहे. मार्च ६५ अखेरीस एकूण सभासद संख्या पुढीलप्रमाणे आहे. उपकर्ते २, आश्रयदाते ५, साहाय्यक ८, हितचिंतक १९, तहह्यात ५५५ व साधारण ८००—एकूण १३८९ (परिषदेच्या चालू घटनेनुसार तिच्या कार्यक्षेत्राबाहेर सुमारे २२५ सभासद–पत्रिका वर्गणीदार या नात्याने आहेत).

**दुखवटा सभा**—भारताचे पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू २७ मे रोजी अकस्मात निधन पावले. त्यांच्या निधनानिमित्त परिषदेचे कार्यालय बंद ठेवण्यात आले होते. ३ जूनला कार्याध्यक्ष श्री. के. नारायण काळे यांच्या अध्यक्षतेखाली दुखवटा सभा भरली होती. या सभेत म. म. द. वा. पोतदार, श्री. काकासाहेब गाडगीळ व श्री. ना. ग. गोरे यांची भाषणे झाली. पंडितजींना श्रद्धांजली वाहणारा ठराव राष्ट्राध्यक्ष व श्रीमती इंदिरा गांधी यांचेकडे पाठविण्यात आला.

परिषदेशी निकटचा संबंध असणाऱ्या तीन साहित्य-सेवकांचे चालू वर्षी निधन झाले. या व्यक्ती म्हणजे माजी अध्यक्ष कै. कृ. पां. कुलकर्णी व कै. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर आणि माजी चिटणीस कै. वा. दा. गोखले. श्री. कृ. पां. कुलकर्णी व श्री. वा. दा. गोखले १२ जूनला एकाच दिवशी निधन पावले. या दोघा विद्वान प्राध्यापकांना व कार्यकर्त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी १७ जूनला श्री. के. नारायण काळे यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. म. म. पोतदार, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. स. के. नेऊरगावकर व प्रा. हेमन्त इनामदार यांची भाषणे झाली.

कै. वरेरकर यांच्या निधनानिमित्त १० आक्टोबरला दुखवटा सभा होऊन त्यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. श्री. के. नारायण काळे, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. नानासाहेब चाफेकर व सौ. विमल चोरघडे यांची भाषणे झाल्यावर दुखवटा संमत झाला. तो श्री. माया चिटणीस यांच्याकडे पाठविण्यात आला.

हिंदीचे एक महाकवी श्री. मैथिलीशरण गुप्त यांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यासाठी परिषदेने न्यू इं. स्कूलच्या सभागृहात १९ नोव्हेंबरला सभा घेतली होती. श्री. के. नारायण काळे यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत डॉ. विश्वनाथ प्रसाद, नवी दिल्ली; डॉ. उदय नारायण तिवारी, जबलपूर; डॉ. रामधन शर्मा, डॉ. भगिरथप्रसाद मिश्र, पुणे विद्यापीठ व प्रा. प्रभुदास भुपटकर यांनी भाषणे करून कै. गुप्त यांना श्रद्धांजली वाहिली.

**स्मृतिदिन**—चालू वर्षी पुढील स्मृतिदिन-समारंभ साजरे झाले. १० एप्रिल रोजी ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांचा. या दिवशी सकाळी कमला नेहरु उद्यानात कै. केतकर यांच्या स्मारकाला पुष्पांजली वाहण्यात आली. सायंकाळी श्री. य. रा. दाते यांचे 'केतकर : व्यक्ति आणि कार्य' या विषयावर व्याख्यान झाले. १३ एप्रिल रोजी औंधचे राजे कै. राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचा. हा स्मृतिदिन विशेष प्रकारे साजरा करावा या हेतूने औंधकरांचे चिरंजीव बॅ. अप्पासाहेब पन्त (भारताचे नॉर्वेतील वकील) यांनी परिषदेला प्रतिवर्षी १०० रु. ची देणगी देण्याचे ठरविले आहे, व त्यातून त्या दिवशी व्याख्यान व्हावे अशी योजना आहे. त्यानुसार यंदा औंधकरांचे एक निकटवर्ती श्री. धोंडो विठ्ठल कुलकर्णी यांचे 'श्रीमंतांचे शैक्षणिक कार्य' या विषयावर व्याख्यान झाले. २० जुलै रोजी कै. वा. म. जोशी यांचा. या दिवशी सायंकाळी प्रा. स. शि. भावे यांचे 'वाङ्मयीन महात्मता आणि वामन मल्हार' या विषयावर व्याख्यान झाले.

२९ नोव्हेंबर रोजी कै. माधवजूलियन यांचा. प्रा. ग. ह. पाटील यांचे व्याख्यान झाले व सौ. यमुनाताई शहाणे यांनी माधवरावांच्या काही कविता गाऊन दाखविल्या. २३ जानेवारी रोजी कै. गडकरी यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. भ. श्री. पंडीत यांचे 'गोविंदाग्रज' या विषयावर व्याख्यान झाले.

**शताब्दी समारंभ**—या वर्षात वुइल्यम शेक्सपिअर, 'काळ' कर्ते शिवरामपंत परांजपे आणि इतिहासाचार्य वि. का. राजवाडे या तिघांचे शताब्दी समारंभ परिषदेतर्फे साजरे करण्यात आले. शेक्सपिअरची चतुर्थ जन्मशताब्दी यंदा पुणे विद्यापीठाच्या सहकार्याने २३ व २४ एप्रिलला न्यू. इं. स्कूलच्या पटांगणात व्याख्यानांच्या रूपाने साजरी करण्यात आली. पहिल्या दिवशीच्या व्याख्यानसत्रात म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. एस. नागराजन्, प्रा. डॉ. मिस मिनोचर होमजी आणि प्रा. मं. वि. राज्याध्यक्ष यांची शेक्सपिअरसंबंधी इंग्रजी भाषेत व्याख्याने झाली. दुसरे दिवशी प्रा. श्री. के. क्षीरसागर याच्या अध्यक्षतेखाली प्रा. वा. ल. कुलकर्णी व डॉ. श्रीराम लागू यांची मराठीत व्याख्याने झाली.

कै. शिवरामपंत परांजपे व कै. वि. का. राजवाडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त दि. २७ जून व १६ जुलै रोजी श्री. ग. वि. केतकर व श्री. गं. दे. खानोलकर यांची 'शिवरामपंतांची लेखणी आणि वाणी'- व 'महानुभाव राजवाडे' या विषयांवर व्याख्याने झाली.

कै. गोविंद नारायण माडगावकर यांचा शंभरावा स्मृतिदिन याच वर्षी येत होता. त्या प्रसंगाने दि. २० मार्चला म. म. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. गं. बा. सरदार यांचे 'गो. ना. माडगावकर : व्यक्ति आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला**—कै. टेंबे यांचे स्मरणार्थ त्यांचे चिरंजीव ( टेंबे बंधु ) देत असलेल्या देणगीतून प्रतिवर्षी परिषदेतर्फे 'कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला आयोजित केली जाते. मालेचे यंदाचे पाचवे व्याख्यानसत्र प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी ३, ४ व ५ जुलै असे तीन दिवस गुंफले. 'गोविंदराव टेंबे यांच्या कलाविषयक सिद्धान्तांचे समीक्षण' हा त्यांच्या व्याख्यानांचा विषय होता.

**सन्माननीयांच्या परिषदेस भेटीगाठी व व्याख्याने**—नांदेडला श्री. पु. ल. देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली जानेवारीत मराठी नाट्यसंमेलन भरले होते. या संमेलनाचा वृत्तान्त कथन करण्यासाठी परिषदेने ८ फेब्रुवारीला सभा भरविली. श्री. के. नारायण काळे, श्री. द. रा. गोमकाळे व प्रा. अ. म. जोशी यांनी संमेलनाचा वृत्तान्त निरनिराळ्या दृष्टिकोणातून सांगितला. कन्नड साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. रं. श्री. मुगळी यांच्या पुण्यातील आगमनाचा लाभ घेऊन परिषदेने १० फेब्रुवारीला त्यांचा सत्कार केला. या दिवशी सायंकाळी त्यांचे 'आधुनिक कन्नड वाङ्मयातील काही प्रवाह' या विषयावर व्याख्यानही झाले.

पूर्वीचा 'ज्ञानप्रकाश' व आजचा 'मराठा' या दैनिकांचे पुण्यातील वार्ताहर श्री. दा. सी. कोकजे यांना एकसष्टावे वर्ष लागल्याबद्दल परिषदेने २७ जानेवारीला त्यांचा सत्कार केला. याप्रसंगी पुण्यातील इतर वृत्तपत्र-प्रतिनिधीही उपस्थित होते.

३१ मार्चला सायंकाळी साहित्य अकादमीचे कार्यवाह श्री कृष्णा कृपलानी यांनी परिषदेस भेट दिली. परिषदेचे पदाधिकारी व उपस्थित व्यक्तीबरोबर त्यांनी अकादमीच्या कार्याबाबत चर्चा केली.

**अतिथिभवन उद्घाटन**—परिषदेच्या 'दिल्ली महाराष्ट्रीय समाज बिल्डिंग ट्रस्ट, अतिथिभवना'चे उद्घाटन १५ ऑगस्टला सकाळी श्री. ना. गो. चापेकर यांच्या हस्ते झाले. या प्रसंगी कार्याध्यक्ष श्री. के. नारायण काळे यांनी उपस्थितांचे स्वागत केले. चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांनी भवनयोजना व त्याच्या उभारणीची माहिती निवेदन केली. खजिनदार डॉ. न. का. घारपुरे यांनी संदेश-वाचन केल्यावर श्री. काकासाहेब गाडगीळ यांनी श्री. चापेकर यांना अतिथिभवनाच्या उद्घाटनाची विनंती केली. उद्घाटनाच्या कार्यक्रमानंतर अतिथिभवन ज्यांच्या प्रयत्नामुळे उभारले गेले त्या श्री. काकासाहेब गाडगीळ यांचा श्री. चापेकर यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. सरस्वतीची मूर्ती, शाल व श्रीफल त्यांना भेट म्हणून देण्यात आले. भवनाचे बांधकाम निरपेक्षपणे करणारे इंजिनिअर श्री. ग. स. आपटे व त्यांचे चिरंजीव श्री. सदाशिवराव आपटे यांचाही अध्यक्षांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. त्यांना चांदीच्या ( ताट, लोटी,

भांडी ) वस्तू देण्यात आल्या. अध्यक्ष श्री. नानासाहेब चापेकर यांचाही शाल व श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. चिटणीस श्री. अ. गं. मंगरूळकर यांनी सर्वांचे आभार मानल्यावर हा समारंभ संपला. श्री काकासाहेब गाडगीळ यांनी सरस्वतीची मूर्ती परिषदेत ठेवण्यास दिली.

**गोवा संमेलन**—मराठी साहित्य संमेलनाचे ४५ वे अधिवेशन मडगाव ( गोवा ) येथे दि. ८,९ व १० मे रोजी श्री. वि. वा. शिरवाडकर ( कुसुमाग्रज ) यांच्या अध्यक्षतेखाली ' साहित्यनगरा 'त मोठ्या थाटात व प्रचंड स्वरूपात भरले होते. प्रतिनिधी संख्येच्या दृष्टीने व इतर अनेक दृष्टींनी हे संमेलन अपूर्व झाले. प्रवासाची गैरसोय सोसून गोमंतकाबाहेरील मराठी प्रदेशातून सुमारे ८ ते १० हजार प्रतिनिधी संमेलनाला उपस्थित होते. प्रतिनिधींच्या निवासभोजनाची व्यवस्था स्वागतमंडळाने उत्कृष्ट ठेवली होती.

संमेलनाचे उद्घाटन मध्यप्रदेशाचे राज्यपाल श्री. ह. वि. पाटसकर यांनी केले व प्रतिनिधींचे स्वागत गोव्याचे मुख्यमंत्री श्री. दयानंद बांदोडकर यांनी केले. ' मराठी कादंबरी आणि नाटक ' या विषयावरील परिसंवाद, ' कविसंमेलन ', ' निबंधवाचन ' इत्यादी साहित्यविषयक कार्यक्रम, कुमार गंधर्वांचे गायन, मत्स्यगंधेचा नाट्यप्रयोग, गोमंतकदर्शन इत्यादी करमणुकीचे कार्यक्रम ही या संमेलनाची खास आकर्षणे होती. संमेलनात संमत झालेले ठराव ' पत्रिके ' च्या १४९ व्या अंकात प्रसिद्ध केले आहेत. प्रस्तुत संमेलनाच्या पूर्वसिद्धतेसाठी व तेथील कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी परिषदेचे चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे व अ. गं. मंगरूळकर संमेलनापूर्वी चार पाच दिवस मडगावला गेले होते. संमेलन यशस्वी करण्यासाठी स्वागताध्यक्ष श्री. का. दा. नायक, कार्याध्यक्ष श्री. द. भ. वाघ, सर चिटणीस श्री. न. पु. सुकेरकर, चिटणीस श्री. मुक्तामाला सावईकर, पांडुरंग फोंडेकर, श्री. आनंद आमोणकर व चंद्रकांत पार्सेकर इत्यादी अनेक कार्यकर्त्यांनी तसेच स्वयंसेवक–स्वयंसेविकांनी परिश्रमांची पराकाष्ठा केली. पुण्याचे मंडप कॉन्ट्रॅक्टर श्री. एस. जी. गोखले यांनी संमेलनासाठी विस्तीर्ण व आकर्षक मंडप उभारला होता. म. म. पोतदार, श्री. काकासाहेब गाडगीळ, डॉ. शं. दा. पेंडसे, श्री. विनायक भावे, श्री. आमदार बा. रं. सुंठणकर, ॲडव्होकेट सुशील कवळेकर, श्री. लक्ष्मीकांत भेंब्रे, मिसेस अताईद, ॲडव्होकेट श्री. कदम इत्यादींच्या ठरावावरील भाषणामुळे व गोवा विलीनीकरणाच्या ठरावामुळे संमेलन खूप गाजले.

अखिल महाराष्ट्रातून आलेल्या प्रतिनिधींच्या व गोमंतकीयांच्या मधील उत्साह व मराठी भाषेवरील प्रेम या समेलनामध्ये ओसंडून वाहात होते. हे संमेलन अनेक दृष्टींनी अपूर्व असे झाले.

**अनुदान**—महाराष्ट्र राज्य सरकारकडून या वर्षी परिषदेस जरी प्रत्यक्ष रु. ३०१५ चे अनुदान मिळाले असले तरी त्यातील फक्त १२०० रु. या वर्षासाठी आहेत. उरलेले पुढील वर्षाच्या हिशेबात धरले जाणार आहेत. पत्रिकेच्या वाङ्मय समालोचन अंकास १५०० रु. चे अनुदान मिळाले आहे.

**साहित्य चर्चा मंडळ**—साहित्यकांनी व जिज्ञासूंनी एकत्र येऊन विविध विषयांवर मोकळेपणाने चर्चा करावी या हेतूने परिषदेने प्रस्तुत मंडळाचा उपक्रम यंदापासून सुरू केला आहे. या उपक्रमाची माहिती व त्यात वाचलेल्या एका टिपणाचा सारांश या अंकात अन्यत्र दिला आहे. प्रत्येक महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यातील गुरुवारी या मंडळाची सभा भरते व त्या त्या विषयांतील तज्ज्ञ व जिज्ञासू मंडळीसमोर निरनिराळ्या विषयावरील संशोधकीय व समीक्षणात्मक टिपणांचे वाचन होऊन चर्चा होते.

**वाङ्मयेतिहास योजना**—परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेपैकी चौथा खंड ( १८०१ ते १८७४ ) प्रा. रा. श्री. जोग यांच्या संपादकत्वाखाली जून ६५ अखेरपर्यंत प्रसिद्ध होत आहे. या खंडाच्या लेखनसिद्धीसाठी व प्रकाशनासाठी ' महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'ने एकूण ११७०० रु. चे अनुदान दिले आहे. तसेच खंड ३ व ५ च्या लेखनसिद्धीसाठी प्रत्येकी ५ हजार रुपये मंडळाकडून परिषदेला मिळाले आहेत. हे दोन्ही खंड प्रा. जोग यांच्याच संपादकत्वाखाली तयार होणार असून लेखकवर्गाची नुकतीच योजना झाली आहे.

**परिषदेची आर्थिक स्थिती**—परिषदेला महाराष्ट्र सरकारकडून फारच थोडे अनुदान मिळत आहे. या वर्षी तर ते केवळ रु. १२०० चे मिळाले आहे. ( प्रथम हप्ता म्हणून रु. ३०१५ चे अनुदान सरकारने दिले. परंतु नंतर

या वर्षीचे अनुदान रु. १२०० चे आहे असे महाराष्ट्र सरकारकडून कळले आहे व बाकीची रक्कम पुढील वर्षीच्या अनुदानाच्या हिशेबात धरली जाईल असा खुलासा झाला आहे. परीक्षा उत्पन्नात रु. ३००० ची घट झाली आहे. अनुदान देण्यासाठी आपल्यासारख्या संस्थेच्या खर्चाच्या मान्य बाबी फार कमी धरतात म्हणून अनुदानाची रक्कम कमी होते. या वर्षीच्या परीक्षा उत्पन्नात रु. ३००० ची घट झाली आहे. दिवसे-दिवस मराठी परीक्षापासून मिळणारे उत्पन्न कमी होत जाईल की काय अशी सकारण शंका येत आहे. परिषदेच्या इतर उत्पन्नावरील बाबीमध्ये वाढ करण्याचा प्रयत्न केला आहे व त्यात थोडी थोडी वाढही झाली आहे, परंतु त्याची रक्कम रु. ७००-८०० पेक्षा फारशी मोठी नाही. परिषदेची खर्चाची तोंडे मात्र वाढत आहेत व नवीन नवीन योजना आखून परिषद अधिक उपयुक्त करावी म्हणावे तर पैशाअभावी या योजनांना गती मिळत नाही. तेव्हा अशा परिस्थितीत परिषदेसारखा ज्येष्ठ साहित्यिक संस्थेस सरकारने प्रतिवर्षी पंधरा हजार रुपयांचे तरी अनुदान द्यावयास पाहिजे. मराठी भाषाप्रेमी गृहस्थांनीही परिषदेस मोठमोठ्या देणग्या देऊन परिषदेच्या कार्यास हातभार लावावा.

**शाखासभा प्रतिनिधींची बैठक**—परिषदेच्या निरनिराळ्या जिल्ह्यांत शाखासभा आहेत. तसेच परिषदेस अनेक सांस्कृतिक व साहित्यिक संस्था संलग्न झाल्या आहेत. या संस्थांच्या प्रतिनिधींची व परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदांची एकत्रित बैठक घेऊन शाखासभांचे कार्य संवर्धित कसे करता येईल यासाठी परिषदेने या वर्षी एक नवीन उपक्रम केला. या शाखासभांकडून व संलग्न संस्थांकडून त्यांच्या कार्याबद्दल, निवडणुकीबद्दल, सभासदसंख्येबद्दल व त्यांच्या अडचणीबद्दल परिषदेने त्यांच्याकडून एक माहितीपर तक्ता भरून घेतला व या सर्व प्रश्नांचा विचार करण्यासाठी रविवार दि. २४ जानेवारी १९६५ रोजी शाखासभांचे प्रतिनिधी व संलग्न संस्थेचे प्रतिनिधी यांची पुणे येथे एक सभा घेतली, परंतु शाखासभा व संलग्न संस्था यांच्याकडून अपेक्षित पाठिंबा मिळाला नाही. सातारा व सांगली या शाखासभांचेच प्रतिनिधी फक्त उपस्थित राहिले. परिषदेचे पदाधिकारी व शाखासंस्थांचे प्रतिनिधी यांच्यात परस्परांच्या अडचणीबाबत व सहकार्याबाबत विचारविनिमय झाला. परिषदेकडून सभासदांच्या वर्गणीबाबत मिळणारा पैसा वाढवून मिळावा व नामवंत साहित्यिकांनी या शाखासभेच्या कार्यक्रमांना हजर राहिल्यास शाखासभांच्या कार्यक्रमांना जोम येईल असे शाखासभांच्या प्रतिनिधींनी सुचविले. परिषदेचे पदाधिकारी व शाखासभांचे प्रतिनिधी यांच्यामधील ही चर्चा पुष्कळशी उद्बोधक झाली.

**आकांक्षा**—परिषदेची सध्याची इमारत परिषदेच्या कार्याच्या विस्ताराच्या दृष्टीने आता अपुरी पडू लागली आहे. परिषदेच्या ग्रंथालयासाठी व संशोधकीय व इतर कार्यासाठी परिषदेस इतरत्र जागा घेऊन इमारत उभी करावी लागणार आहे. त्याखेरीज परिषदेच्या कार्याचा वाढता पसारा सुव्यवस्थित राहणार नाही. जागेच्या व इमारतीच्या अभावी परिषदेची कुचंबणा होत आहे. परिषदेच्या नोकरवर्गात व त्यांच्या परिस्थितीत वाढ करणे आवश्यक आहे.

सन १९६६ मध्ये परिषदेच्या कार्यास ६० वर्षे पुरी होत आहेत. तसेच त्याच वर्षी कवी केशवसुतांची जन्मशताब्दी येत आहे. त्या निमित्ताने परिषदेचा हीरक-महोत्सव वरील योजना अमलात आणून साजरा करता आला तर परिषदेच्या कार्यास विशेष गती मिळणार आहे. तरी सभासदांनी या कामी सर्व प्रकारचे सहकार्य दिल्यास सदरील योजना वाटचाल करू लागतील अशी आशा आहे.

**परीक्षा**—डिसेंबर १९६४ मध्ये झालेल्या परिषदेच्या परीक्षांची यंदा ७४ केंद्रे होती. सर्व केंद्रांना मिळून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले होते.

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण | प्रमाण |
|---|---|---|---|
| प्रथमा | १३४१ | १००५ | ७२% |
| प्रवेश | ५४६ | ३६८ | ७८% |
| प्राज्ञ | २७२ | १४४ | ६९% |
| विशारद | ५५ | १३ | ४१% |
| आचार्य | २ | × | |
| | २२१६ | १५३० | |

या वर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पुढील उमेदवार पहिले आले :—

**प्रथमा**—अनिल वसंत ओझरकर–जळगाव, पारितोषिक रु. १०.

**प्रवेश**—किशोर कल्याण मुश्रीफ-डोंबिवली, पारितोषिक रु. १५.

**प्राज्ञ**—अविनाश गंगाधर गोखले–पुणे. ( नू. म. वि. ) न्या. मा. गो. रानडे पारितोषिक रु. ५० व कै. विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक रु. ५०.

**विशारद**—सुधा सदाशिव पाध्ये–पुणे, कै. विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक रु. १००.

आमगाव देवळी या केंद्राच्या विशारद परीक्षेला बसलेल्या सर्व उमेदवारांनी कॉपी केल्याचे निदर्शनाला आल्यामुळे परीक्षासमितीच्या ठरावानुसार त्यांना अनुत्तीर्ण ठरविण्यात आले व केंद्रमान्यता काढून घेण्यात आली.

**परीक्षा वर्ग**—७ जुलै ते डिसेंबर अखेर प्राज्ञ-विशारद परीक्षांचे वर्ग नेहमीप्रमाणे चालविण्यात आले. या वर्षी प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्रा. चंद्रकुमार डांगे, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. स. शि. भावे, प्रा. म. वि. गोखले, प्रा. अरविंद कुलकर्णी, प्रा. ग. स. शुक्ल, श्री. मो. रा. वाळंबे, प्रि. वसंत देसाई, श्री. प्र. शं. जोशी, प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर व प्रा. गं. ना. जोगळेकर यांनी वर्गात अध्यापनकार्य करण्याचे मान्य केले आहे.

**ग्रंथालय**—चालू वर्षी १५३–२५ रु. चे ग्रंथ विकत घेण्यात आले. पत्रिकेला अभिप्रायार्थ आलेल्या पुस्तकांपैकी १२२ पुस्तके ग्रंथालयाकडे आली.

प्रा. अ. गं. मंगरूळकर यांनी आपल्याकडील ५० मूल्यवान पुस्तके ग्रंथालयास भेटीदाखल दिली. तसेच केसरी–मराठा ग्रंथशालेकडून मासिकांचे काही अंक, पुस्तके देणगीदाखल आली. वरील देणगीदारांची परिषद ऋणी आहे.

**महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका**—चालू वर्षी प्रा श्री. के. क्षीरसागर यांच्या संपादकत्वाखाली पत्रिकेचे ३ अंक प्रसिद्ध झाले ( त्यांपैकी एक जोडअंक ). पत्रिकेला परतभेट म्हणून पुढील नियतकालिके येतात.

**दैनिके**—सकाळ, केसरी, तरुण भारत (पुणे व नागपूर आवृत्ती ), विशाल सह्याद्रि, गोमंतक, गोमंतवाणी, सोलापूर समाचार, प्रदीप, नवहिंद टाइम्स.

**अर्ध साप्ताहिक**—मराठवाडा.

**साप्ताहिके**—साधना, महाराष्ट्र, नागपूर, गावकरी, प्रतोद, प्रबोधचंद्रिका, पीपल्स राज, सोवियत देश, अर्थ, ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिस, शिवनेर, प्रेरणा, आलमगीर.

**पाक्षिके**—अमेरिकन वार्ताहर, समाजपत्रिका, माणूस.

**मासिके**—किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, सत्यकथा, उद्यम, पुरुषार्थ, चित्रमयजगत, महाराष्ट्र, युगवाणी, प्रतिष्ठान, प्रसाद, नवभारत, एकता, अमृत, साहित्य सहकार, व्यापारी महाराष्ट्र, पी. ई. एन्. राष्ट्रवाणी, सन्मति, चालना, महात्मा, गोकुळ, शालापत्रक, आनंद, मुलांचा शाम, कुमार, मांडवी, सह्याद्रि, महाराष्ट्र विस्तार, भारत मित्र, शारदा.

**त्रैमासिके**—मराठी संशोधन पत्रिका, पंचधारा, भारतीय इतिहास आणि संस्कृती, पुणे विद्यापीठ पत्रिका, Bulletin Deccan College Research Institute, Journal of the Tanjore Saraswati Mahal Library.

**वि. त्र्यं. शेटे**
**अ. गं. मंगरूळकर**
**म. ना. अदवंत**
चिटणीस

## महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे २.
दि. १५-५-१९६५

### नियामक मंडळ सभा

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. २७ जून १९६५ रोजी दुपारी ३॥ वा. पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरणार आहे. मंडळाच्या सभासदांनी सभेला अवश्य यावे ही विनंती.

**कामे**

( १ ) दुखवटा
( २ ) मागील सभेचा वृत्तान्त वाचून तो संमत करणे
( ३ ) सन १९६४-६५ चे वार्षिक इतिवृत्त संमत करणे
( ४ ) सन १९६४-६५ चा जमाखर्च व ताळेबंद संमत करणे
( ५ ) सन १९६५-६६ चा अर्थसंकल्प संमत करणे
( ६ ) वार्षिक सभेपुढे घटना दुरुस्ती वगैरे जे प्रश्न मांडावयाचे त्यांचा विचार करणे
( ७ ) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळची कामे

| | |
|---|---|
| वि. त्र्यं. शेटे | वि. वा. शिरवाडकर |
| अ. गं. मंगरुळकर | अध्यक्ष |
| म. ना. अदवंत | के. नारायण काळे |
| चिटणीस | कार्याध्यक्ष |

### वार्षिक साधारण सभा

टिळक रस्ता, पुणे २
स. न. वि. वि. दि. १५ ५-६५

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २७ जून १९६५ रोजी दुपारी ५॥ वा. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरणार आहे. सर्व सभासदांनी सभेला अवश्य यावे. विनंती.

( १ ) दुखवटा
( २ ) मागील सभेचा वृत्तांत वाचून तो संमत करणे
( ३ ) सन १९६४-६५ चे इतिवृत्त संमत करणें
( ४ ) सन १९६४-६५ चे हिशेब-तपासनीस यांनी तपासलेले जमाखर्च व ताळेबंद संमत करणे
( ५ ) सन १९६५-६६ चा अर्थसंकल्प संमत करणे
( ६ ) कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या घटना दुरुस्तीचा विचार करणे
( ७ ) म. सा. परिषदेच्या हीरक महोत्सवाबद्दल विचार
( ८ ) हिशेब-तपासनिसाची निवड
( ९ ) अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळी येणारी कामे

| | |
|---|---|
| वि. त्र्यं. शेटे | वि. वा. शिरवाडकर |
| अ. गं. मंगरुळकर | अध्यक्ष |
| म. ना. अदवंत | के. नारायण काळे |
| चिटणीस | कार्याध्यक्ष |

**सूचनाः**—( १ ) सूचित घटनादुरुस्ती याच अंकात यापुढे दिली आहे (२) कोणाही सभासदास इतिवृत्त अथवा जमाखर्च ताळेबंद यासंबंधी वार्षिक सभेत कांही प्रश्न विचारावयाचे असल्यास अथवा ठराव मांडावयाचे असल्यास त्याने ते लेखी स्वरूपात सभेच्या अगोदर सात दिवस कार्यालयाकडे पाठविले पाहिजेत. —चिटणीस

### घटना-दुरुस्ती

दिनांक २७ जून १९६५ रविवार रोजी म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा भरणार आहे. त्या वेळी परिषदेच्या घटनेस पुढीलप्रमाणे दुरुस्त्या सुचविण्यात येणार आहेत. खाली नमूद केलेले नवे सूचितनियम आहेत. सभासदांना त्याबाबत काही सूचना पाठवावयाच्या असल्यास त्या त्यांनी सभेपूर्वी लेखी स्वरूपात कार्यालयाकडे पाठवाव्यात. पत्रिकेच्या अंक क. १४६-४७ मध्ये प्रस्तुतची घटना दिली आहे त्या संदर्भात खालील दुरुस्त्या वाचाव्यात.

—चिटणीस.

( १ ) घटनेतील सध्याचा नियम नं. १० पुढीलप्रमाणे राहील.

" नियम नं. १० :–– महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पदाधिकारीः—अध्यक्ष १, उपाध्यक्ष ३, कार्याध्यक्ष १, खजिनदार १, असे एकूण ६

वरील सहा पदाधिकाऱ्यांची निवडणूक परिषदेच्या मताधिकारी सभासदांनी आपल्यांतून दर तीन वर्षांनी

गुप्तमतदान पद्धतीने लेखी मते पाठवून करावयाची आहे. जाहीर सूचना देऊन चिटणिसानी परिषदेच्या सभासदाकडून वरील ६ पदाधिकाऱ्यांच्या जागांसाठी नावे मागवावीत. या जागांसाठी उभे असणारे उमेदवार महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या निवडणुकीपूर्वी किमान १ वर्ष सभासद असले पाहिजेत व सूचनापत्रावरोबर त्यांच्या स्वाक्षरीसह त्यांची लेखी संमती असली पाहिजे. सूचक व अनुमोदक हे परिषदेचे सभासद असले पाहिजेत. निवडणूकक्रमपद्धतीने होईल व ज्याला सर्वांत अधिक मते पडतील तो त्या पदाधिकाऱ्याच्या जागी निवडून आला असे जाहीर करण्यात येईल.

( २ ) (अ) घटनेतील सध्याचा नियम नं. १० आहे. त्यास नियम नं. ११ म्हणावे. त्यातील ' दोन ' या शब्दाऐवजी ' पुढील ' असा शब्द असावा.

( ब ) घटनेतील सध्याचा नियम नं. ११ यास नियम नं. १२ म्हणून संबोधावे व त्यात परिषदेचे ५ उपाध्यक्ष म्हटले आहे तेथे ३ उपाध्यक्ष म्हणावे.

( क ) घटनेतील सध्याचा नियम नं. १२ गाळून टाकावा.

( ३ ) नियम नं. १२:—

नियामक मंडळ :—नियामक मंडळाची रचना खालीलप्रमाणे असावी.

( अ ) अधिकारपरत्वे सभासद—१ परिषदेचे अध्यक्ष, ३ परिषदेचे उपाध्यक्ष, १ परिषदेचे कार्याध्यक्ष व १ खजिनदार असे एकूण ६

( आ ) विभागीय सभासद :— या निवडणुकीकरता सभासदांचे पुढीलप्रमाणे गट करण्यात येत आहेत. यापैकी प्रत्येक गटामागे कमीत कमी १ व अधिकात अधिक २० सभासद खालीलप्रमाणे निवडता येतील. ( १ ) ज्या गटात १५ किंवा १५ पेक्षा कमी सभासद असतील त्या गटामागे एक सभासद व ( २ ) ज्या गटात १५ पेक्षा अधिक सभासद असतील त्या गटाकरता दर १५ पूर्ण संख्येस १ याप्रमाणे सभासद निवडता येतील, पण कोणत्याही गटातर्फे २० पेक्षा अधिक सभासद नियामक मंडळावर निवडले जाणार नाहीत.

गटः—(१) पुणे (२) सातारा (३) सांगली (४) कोल्हापूर (५) सोलापूर (६) अहमदनगर (७) धुळे (८) जळगाव (९) कुलाबा (१०) रत्नागिरी (११) नाशिक (१२) ठाणे (१३) बेळगाव कारवार (१४) गोवा (१५) उर्वरित भाग

( इ ) संलग्न संस्थांचे प्रतिनिधी ५० किंवा अधिक सभासद असल्यास प्रत्येक संस्थेस १, पन्नासपेक्षा कमी सभासद असल्यास एकाच विभागातील संस्था एकत्र होऊन ५० संख्या झाल्यास त्या सर्वांस मिळून १.

( ई ) स्वीकृत सभासद—आवश्यक वाटल्यास नियामक मंडळास १० पर्यंत सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार आहे.

( ४ ) नियम नं. १३ ( अ ) — नियामक मंडळातील विभागीय सभासदांची निवडणूक त्रैवार्षिक असावी व ती गुप्त मतदान पद्धतीने करण्यांत यावी. या निवडणुकीकरता त्या विभागातील मताधिकारी सभासद उमेदवारासच त्या त्या विभागातील मताधिकारी सभासदांची लेखी मते मागवून त्या त्या विभागातर्फे निवडून येता येईल.

( ५ ) नियम नं. १६ परिषदेची वार्षिक साधारण सभा— ( १ ) परिषदेची वार्षिक साधारण सभा वर्ष संपल्यापासून चार महिन्यांच्या आत भरविली पाहिजे, तसेच याच नियमाच्या पोटकलम ३ मध्ये ' वर्ष संपून ४ महिन्यांचे आत ' त्याऐवजी ' वर्ष संपून ५ महिन्यांचे आत ' अशी दुरुस्ती करावी.

( ६ ) नियम नं. ४३ ( अ ) :— परिषदेच्या या शब्दापुढे ' संमेलनविषयक नियम ' हे शब्द चुकीने पडले आहेत ते गाळावेत.

( ७ ) नियम नं. ४६ ( २ )— अध्यक्ष निवडणूक यापुढे "[ नियम नं. १२ पहा ]" हे शब्द गाळून टाकावेत. " महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळने संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी कमीत कमी ३ व जास्तीत जास्त ५ नावे सुचवावीत. याप्रमाणे सुचविलेल्या नावांतून संमेलनाचे स्वागत मंडळ संमेलनाच्या अध्यक्षाची निवड करील. संमेलनाच्या अध्यक्षाचे अधिकार संमेलनापुरतेच मर्यादित राहतील.

( ८ ) नियम नं. ४६ ( ३ )— स्वागत मंडळाने आलेल्या ठरावांची एक प्रत म. सा. प. च्या कार्यालयाकडे अधिवेशनापूर्वी निदान पंधरा दिवस आधी पाठवावी.

( ९ ) नियम नं. ४६ ( ७ ) :—अध्यक्षीय निर्णय या परिच्छेदामधील मजकुरात म. सा. प. च्या अध्यक्षाच्या याऐवजी ' संमेलनाच्या अध्यक्षांचा ' असे शब्द घालावेत.

# महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल IX नियम

दि. १ एप्रिल १९६४ ते दि. ३१

| खर्च | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|
| **जिंदगी :** | | |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर व भुई भाडे | १७५-८० | |
| वीज | १७७-९९ | ३५३-७९ |
| **संस्था :** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | ५,४६८-०१ | |
| कार्यालय छपाई | १२५-२५ | |
| कार्यालय टपाल-फोन | ६७९-५३ | |
| सादील ( स्टेशनरी ) | १०५-३१ | |
| आतिथ्य | ३०९-१५ | |
| प्रवास-प्रचार-महामंडळ | ६४४-०२ | ७,३३१-२७ |
| विश्वस्तांना संभावना द्रव्य | ... | ००-०० |
| वकील फी—कोर्ट खर्च | ... | ००-०० |
| हिशेब-तपासनीस (१९६३-६४) | | १००-०० |
| कार्यकारी-नियामक सभा | | ८०५-३० |
| शाखा-सभा (वर्गणी हिस्सा) | | २९५-१२ |
| संमेलन (गोवा) | | १,३७३-६६ |
| किरकोळ | | ३६९-६१ |
| परीक्षा खर्च | | ६,१८०-६५ |
| "पत्रिका" (कागद, छपाई, टपाल इ.) | | ५,८४३-२८ |
| रानडे पारितोषिक | | ५०-०० |
| पंत प्रतिनिधी व्याख्यानमाला | | १००-०० |
| साहित्य चर्चा मंडळ | | ७४-३० |
| **घसारा :** | | |
| इमारत २½ % | २,४२३-१२ | |
| फर्निचर १० % | ७४६-७३ | ३,१६९-८५ |
| | एकूण ... रु. | २६,०४६-८३ |

पुणे
दि. २३-४-१९६५.

जी. एम्. ओक आणि कं.
चार्टर्ड अकौंटन्टस्

# परिषद, पुणे २

## १७ (१) प्रमाणे

### मार्च १९६५ अखेर मुदतीचे उत्पन्न-खर्च पत्रक

| जमा | | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|---|
| देणग्या (मा. प. सभागृह) | | | | ८०७-०० |
| सरकारी अनुदान | | | | ३,०१५-०० |
| डिव्हिडंड (निव्वळ) | | | | ११५-१५ |
| **व्याज :** | | | | |
| बँक | ... | ... | ५३६-७२ | |
| अल्पमुदत ठेवी | ... | ... | २८८-५१ | |
| सिक्युरिटीज | ... | १,३९७-६७ | | |
| वजा—जांभेकर पारितोषिकाकडे वर्ग | रु. ४०-०० | | | |
| गोखले पारितोषिकाकडे वर्ग | रु. ४६८-०० | ५०८-०० | ८८९-६७ | १,७१४-९० |
| **इतर उत्पन्न :** | | | | |
| साधारण सभासद वर्गणी | | | | २,८६७-०० |
| संलग्न संस्था वर्गणी | | | | ८०-०० |
| " पत्रिका " वर्गणी | | | | ५१२-०० |
| " पत्रिका " जाहिरात वगैरे | | | | ४४६-०० |
| परीक्षा शुल्क | | | | ८,३५५-०० |
| संमेलन | | | | १,१४६-०० |
| किरकोळ | | | | १०६-९० |
| रानडे पारितोषिक | | | | ५०-०० |
| पंत प्रतिनिधी व्याख्यानमाला | | | | १००-०० |
| साहित्य चर्चामंडळ | | | | १३०-०० |
| **प्रकाशने :** | | | | |
| ग्रंथ विक्री (१९६४-६५) (वसूल) | | ७,२२४-९२ | | |
| + ग्रंथ विक्री येणे | | ११६-१५ | ७,३४१-०७ | |
| + मार्च १९६५ अखेरचा साठा : (ॲट कॉस्ट) | | | १४,४९३-०६ | |
| वजा :—वर्षारंभाचा साठा | | १०,२८८-५७ | २१,८३४-१३ | |
| १९६४-६५ मधील खर्च | | १३,९३७-४९ | २४,२२६-०६ | |
| तूट प्रकाशन निधीकडे वर्ग | | ... | २,३९१-९३ | १९,४४४-९५ |
| चालू सालातील तोटा | | ... | | ६,६०१-८८ |
| | | | | २६,०४६-८३ |

ध. रा. गाडगीळ
वि. द. घाटे
विश्वस्त.

न. का. घारपुरे
खजिनदार.

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर
म. ना. अदवन्त
} चिटणीस.

# महाराष्ट्र साहित्य

**शेड्यूल VIII नियम**

**दि. ३१ मार्च १९६५**

| निधी व देणी | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|
| **कायम निधी** | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | ४८,७७६–२० | |
| + ६४–६५ तहहयात वर्गणी | | ३९१–०० | ४९,१६७–२० |
| **इतर राखीव निधी :** | | | |
| **१. इमारत :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ८०,५३४–२४ | | |
| + ६४–६५ मधील जमा | ६,४४२–५४ | ८६,९७६–७८ | |
| **२. ग्रंथालय : ( ग्रंथरूपाने निधी )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १९,४८७–१२ | | |
| + परीक्षणाला आलेली पुस्तके | ४९१–०० | १९,९७८–१२ | |
| **३. कै. डॉ. केतकर स्मारक ( रोख )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | २०१–०० | | |
| - १९६४–६५ मधील खर्च | ३०–०० | १७१–०० | |
| **४. कै. टेंवे व्याख्यानमाला ( रोख )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | २९१–२३ | | |
| – १९६४–६५ मधील खर्च | २९१–२३ | | |
| | ००–०० | | |
| + १९६४–६५ मधील जमा | ३००–०० | ३००–०० | |
| **५. प्रकाशन पारितोषिक ( रोख )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | २०४–०० | |
| **६. वाङ्मयेतिहास योजना ( रोख )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३,०७६–८० | | |
| –१९६४–६५ मधील खर्च | १,९८४–४८ | | |
| | १,०९२–३२ | | |
| + १९६४–६५ मधील अनुदान … | १६,७००–०० | १७,७९२–३२ | |
| **७. प्रकाशन निधी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३४,०१४–३३ | | |
| वजा – ६४–६५ मधील तूट | २,३९१–९३ | ३१,६२२–४० | |
| **८. जांभेकर पारितोषिक ( सिक्यु. )** | | | |
| मागील ताळेबंदावरून … | १,१२०–०० | | |
| + ६४–६५ मधील व्याज … | ४०–०० | १,१६०–०० | |
| पुढील पानावर | | १,५८,२०४–६२ | ४९,१६७–२० |

# परिषद, पुणे २

१७ ( १ ) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|
| **स्थिर जिंदगी :** | | |
| इमारत लीजहोल्ड जागेवर | | |
| मागील ताळेबंदावरून | ८५,८४५-८९ | |
| अधिक : अतिथिभवन नवीन बांधकाम खर्च | ११,१०७-२३ | ९६,९५३-१२ |
| **रोखे** ( दर्शनी किंमतीचे ) | | |
| ३ टक्के १९४६ कन्व्हर्शन लोन | ५,३००-०० | |
| ३ टक्के १९४६ कन्व्हर्शन लोन | २,७००-०० | |
| ३ टक्के १९७०-७५ फर्स्ट डेव्ह. लोन | १०,८००-०० | |
| ४ टक्के १० वर्ष ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिटस | १,४००-०० | |
| ४॥ टक्के १० वर्ष डि. डिपॉ. सर्टिफिकेटस | २६,०००-०० | ४६,२००-०० |
| **शेअर्स** ( दर्शनी किंमतीने ) | | |
| २५ बँत्रे स्टेट को-ऑप. बँक लि. प्रत्येकी ५० रु. चे | १,२५०-०० | |
| २३ सें. प्रॉव्हि. रेल्वे प्रत्येकी रु. १०० चे | २,३००-०० | ३,५५०-०० |
| **फर्निचर व डेड-स्टॉक** | | |
| मागील ताळेबंदावरून | ७,४२४-५३ | |
| + १९६४-६५ मधील खर्च | ४२-७७ | ७,४६७-३० |
| **ग्रंथसंग्रहालय** | | |
| मागील ताळेबंदावरून | २०,०५१-६७ | |
| १९६४-६५ मधील खरेदी | १५३-२५ | |
| परीक्षणाला आलेली पुस्तके | ४९१-०० | २०,६९५-९२ |
| **ग्रंथ विक्री येणे** | | ११६-१५ |
| **शिल्लक पुस्तकांची किंमत** | | १४,४९३-०६ |
| ( मा. चिटणीस यांनी दाखला दिल्याप्रमाणे ) | | |
| महाराष्ट्र स्टेट इलेक्ट्रिसिटी बोर्ड डिपॉझिट | | २६०-०० |
| अॅडव्हान्सेस | | ८५-०० |
| ग. म. आपटे इंजिनिअर यांना अॅडव्हान्स | | ५४७-२९ |
| इनकम-टॅक्स ( वसूल व्हावयाची रक्कम ) | | ९३-४० |
| पुढील पानावर | | १,९०,४६५-२४ |

## महाराष्ट्र साहित्य

**शेड्यूल VIII नियम**

**दि. ३१ मार्च १९६५**

| निधी व देणी | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|
| | मागील पानानरून | १,५८,२०४-६२ | ४९,१६७-२० |
| **९. कै. वि. ब. व कै. पार्वतीबाई गोखले पारितोषिके ( सिक्यु. )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ५,३००-०० | | |
| + ६४-६५ मधील भर | ४६८-०० | | |
| | ५,७६८-०० | | |
| – ६४-६५ मधील खर्च पारितोषिक | १५० ०० | ५,६१८-०० | |
| **१०. वाङ्मय समालोचने ( रोख )** | | | |
| मागील ताळेबंदावरून ... | १,७७३-०६ | | |
| + देणग्या ( ६४-६५ ) ... | २,२००-०० | | |
| | ३,९७३-०६ | | |
| – १९६४-६५ मधील खर्च | १,७७३-०६ | २,२००-०० | |
| **११. कै. ह. ना. आपटे शताब्दी अनुदान ( रोख )** | | १,०००-०० | |
| **१२. प्रॉव्हिडंट फंड ( सेवक वर्ग )** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ४,२२१-९१ | | |
| १९६४-६५ ची जमा ( कार्यालय + सेवक वर्गाचा हिस्सा ) | ३२०-५५ | | |
| १९६४-६५ मधील व्याज | २१३-५१ | ४,७५५-९७ | |
| **१३. घसारा** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ९,३३३-७३ | | |
| १९६४-६५ ची तरतूद | ३,१६९-८५ | १२,५०३-५८ | १,८४,२८२-१७ |
| **कर्ज** | | ... | ००-०० |
| **देणी** | | | |
| सांगली शाखासभा पारितोषिक ( सिक्यु. ) | | ... | ४००-०० |
| | | एकूण ... रु. | २,३३,८४९-३७ |

पुणे,
दि. २३-४-१९६५.

जी. एम्. ओक आणि कं.
चार्टर्ड अकौंटन्टस्

## परिषद, पुणे २

### १७ ( १ ) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद ( पुढे चालू )

| जिंदगी व येणी | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|
| मागील पानावरून | | १,९०,४६५–२४ |
| **तोटा :** | | |
| चालू सालातील ... | ६,६०१–८८ | |
| वजा—मागील सालच्या ताळेबंदावरून वाढावा. ... | २,३६३–०४ | ४,२३८–८४ |
| **अखेर शिल्लक :** | | |
| रोख व टपालरूपाने ... | १,४०६–९४ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., सेव्हिंग्ज खाते ... | १८,९२६–२६ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., करंट खाते ... | २११–२१ | |
| पुणे सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि., करंट खाते ... | ६०–८४ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., अल्प मुदत ठेव ... | १२,०००–०० | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, ट्रस्टी खाते ... | १,७८४–०७ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., प्रॉव्हिडंट फंड ... | १,०५५–९७ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., प्रॉव्हिडंट फंड ( ठेवी ) ... | ३,७००–०० | ३९,१४५–२९ |
| टीप : सदरील रोख रकम रु. ३९१४५ : २९ मध्ये सशर्त व अंकित ( इअर मार्कड् ) रकम रु. ३८८९४ चा समावेश आहे. | | |
| एकूण ... रु | | २,३३,८४९–३७ |

ध. रा. गाडगीळ
वि. द. घाटे
विश्वस्त

न. का. घारपुरे
खजिनदार

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर
म. ना. अदवन्त
} चिटणीस

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## दिनांक १ एप्रिल १९६५ ते दिनांक ३१ मार्च १९६६ अखेरच्या वर्षाचा अर्थसंकल्प

| जमा | | | खर्च | | |
|---|---|---|---|---|---|
| सन १९६४-६५ प्रत्यक्ष | जमा-खाते | सन १९६५-६६ अंदाज | सन १९६४-६५ प्रत्यक्ष | खर्च-खाते | सन १९६५-६६ अंदाज |
| रु पैसे | | रु. पैसे | रु. पैसे | | रु. पैसे |
| ८८९-६७ | विश्वस्तांकडील व्याज | १,७००-०० | | | |
| ८२५-२३ | इतर व्याज | ९००-०० | १७५-८० | पुणे म्युनि. कॉर्पो. कर व भुई भाडे | :१७५-०० |
| ८०७-०० | मा. प. सभागृह | ९००-०० | १७७-९९ | वीज ... | १७५-०० |
| २,८६७-०० | साधारण सभासद वर्गणी | २,८००-०० | ५,४६८-०१ | पगार व प्रॉव्हि. फंड ... | ५,८००-०० |
| ८०-०० | संलग्न संस्था वर्गणी | ८०-०० | १२५-१५ | कार्यालय छपाई ... | १२५-०० |
| ५१२-०० | 'म. सा. पत्रिका' वर्गणी | ५००-०० | ६७९-५३ | कार्यालय टपाल व फोन ... | ६००-०० |
| ४४६-०० | ,, जाहिरात | ४००-०० | १०५-३१ | सादील (स्टेशनरी) ... | १००-०० |
| ८,३५५-०० | परीक्षा शुल्क | १०,०००-०० | ३०९-१५ | आतिथ्य ... | ३००-०० |
| १,१४६-०० | संमेलन | ... | ६४४-०२ | प्रवास, प्रचार महामंडळ ... | ६००-०० |
| १०६-९० | किरकोळ | १००-०० | १००-०० | हिशेब-तपासनीस ... | १००-०० |
| ३,०१५-०० | सरकारी अनुदान | १,०००-०० | ८०५-३० | कार्यकारी नियामक ... | १,२००-०० |
| | पुणे महानगरपालिका अनुदान | ३००-०० | २९५-१२ | शाखासभा (हिस्सा) ... | ३००-०० |
| ५०-०० | न्या. रानडे पारितोषिक | ५०-०० | १,३७३-६६ | संमेलन ... | — |
| २,२००-०० | वाङ्मय समालोचने | १,५००-०० | ३६९-६१ | किरकोळ ... | ३००-०० |
| १००-०० | पंत प्रतिनिधी व्याख्यानमाला | १००-०० | ६,१८०-६५ | परीक्षा खर्च ... | ७,०००-०० |
| ३००-०० | कै. टॅंबे व्याख्यानमाला | ३००-०० | ५,८४३-२८ | 'म. सा. पत्रिका' ... | ५,०००-०० |
| १३०-०० | साहित्य चर्चा मंडळ | १००-०० | ५०-०० | न्या. रानडे पारितोषिक ... | ५०-०० |
| १५९-०० | वि ब. गोखले पारितोषिक | १५९-०० | १५९-०० | वि. ब. गोखले पारितोषिक ... | १५९-०० |
| | | | ३००-०० | टॅंबे व्याख्यानमाला ... | ३००-०० |
| | रु. | २०,८८९-०० | १००-०० | पंत प्रतिनिधी व्याख्यानमाला | १००-०० |
| | तोटा ... रु. | ७,१४५-०० | ७४-३० | साहित्य चर्चामंडळ ... | १००-०० |
| | | | — | नवीन सामान ... | ५००-०० |
| | | | — | ग्रंथालय ... | ३००-०० |
| | | | — | संशोधन ... | १००-०० |
| | | | — | वाङ्मय समालोचने ... | १,५००-०० |
| | | | २,४२३-१२ | घसारा—इमारत ... | २,४००-०० |
| | | | ७४६-७३ | घसारा—फर्निचर ... | ७५०-०० |
| | एकूण ... रु. | २८,०३४-०० | | एकूण रु. | २८,०३४-०० |

न. का. घारपुरे
खजिनदार

वि. त्र्यं. शेटे
अ. गं. मंगरूळकर } चिटणीस
म. ना. अदवन्त

अनुक्रमणिका



३१. पाटील पां. चि.—माझ्या आठवणी, मौज प्रकाशन गृह, पुणे २; १५ रु.

३२. प्रियोळकर अ. का.—गो. ना. माडगावकर, मुं. म. ग्रंथसंग्रहालय, मुंबई १४; १ रु.

३३. नानासाहेब फाटक—मुखवट्यांचे जग, भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; १२ रु.

३४. वर्वे रा. का.—राजकीय हत्या, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ४ रु.

३५. मोडक आ. वा.—आत्मारामाची वाटचाल, मोडकगुरुजी सत्कारसमिति, चिपळूण; ६ रु.

## ललित

३६. गाडगीळ बाळ—सिगरेट आणि वसंतऋतु, सुविचार प्रकाशन, पुणे २; ८ रु.

३७. मोकाशी दि. बा.—पालखी, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; ५ रु.

३८. रेगे शां. शं.—सुरंग, सुविचार प्रकाशन, पुणे २; ५ रु.

३९. साने गुरुजी—श्यामची पत्रे, साधना प्रकाशन, पुणे २; ३ रु.

## टीका

४०. कुलकर्णी भीमराव—वाङ्मयीन रसास्वाद, विदर्भ मराठवाडा बुक कं., पुणे २; ५ रु.

४१. केतकर श्री. त्र्यं.—महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण ( द्वि. आ. ), व्हीनस प्रकाशन, पुणे २; ७ रु.

४२. गोमकाळे द. रा.—त्यांना रम्य भाविकाळ, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणे २; ४ रु.

४३. वेडेकर दि. के.—साहित्यविचार, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; १० रु.

४४. माधवजूलियन—काव्यचिकित्सा ( संपादन गं. दे. खानोलकर ) व्हीनस प्रकाशन, पुणे २; ६ रु.

## वाङ्मयसंशोधन–संपादने

४५. कोलते वि. भि.—सह्याद्रिवर्णन (खळोबा दास) पुणे विद्यापीठ, पुणे ७; १२ रु.

४६. तुळपुळे शं. गो.—लीळाचरित्र एकांक, सुविचार प्रकाशन, पुणे २; ५ रु.

४७. जोशी ना. व.—रुक्मिणी स्वैवर ( श्रीसंतोषमुनी कृष्णदास ), श्रीगीताश्रम, हैद्राबाद १; ८ रु.

४८. देशपांडे ज. शा.—प्राचीन मराठी कविता ( खंड २ ), मुं. म. ग्रंथसंग्रहालय, मुंबई २४; ४ रु.

४९. मिराशी वा. वि.—संशोधन मुक्तावली ( सर ४ था ), विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर १; ४ रु.

## भाषा, संस्कृति, समाज, शिक्षण, राजकारण इ.

५०. कर्वे इरावती—हिंदूंची समाजरचना, नागपूर विद्यापीठ, नागपूर १; ५ रु.

५१. कालेलकर ना. गो.—भाषा, इतिहास आणि भूगोल, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; ६=५०

५२. केळकर न. चिं.—वृत्तपत्रमीमांसा ( सं.-का. न. केळकर ), नीळकंठ प्रकाशन, पुणे २; ४ रु.

५३. ढगे ज. ना.—स्वप्नसृष्टि, मराठी थिऑ. फेडरेशन, अकोला; २ रु.

५४. ढेरे रा. चिं.—मराठी लोकसंस्कृतीचे उपासक, ज्ञानराज प्रकाशन, पुणे २; ५ रु.

५५. देवळे शं. रा.—बारा ज्योतिर्लिंगे, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ३ रु.

५६. धायगुडे य. ए.—मायबोलीचे शुद्धलेखन. कृ. ग. देशमुख, पुणे २; ५० पैसे.

५७ पटवर्धन य. व.—शब्दकौमुदी, नीळकंठ प्रकाशन पुणे २; ७=५०

५८. पेंडसे लालजी—महाराष्ट्राचे महामंथन. साहित्य सहकार संघ लि. मुंबई १४; २५ रु.

५९. वेडेकर मालतीबाई—संकटमुक्त स्त्रियांचे पुनर्वसन, साधना प्रकाशन, पुणे २; ५० पैसे.

६०. भागवत रा. स.—कर्माचा सिद्धांत व त्याचे सुबोध विवेचन, मराठी थिऑ. फेडरेशन, अकोला; १=५०

६१. भागवत रा. स.—जगाचा इतिहास व त्याचे मर्म, मराठी थिऑ. फेडरेशन, अकोला; ३=५०

६२. भागवत रा. स.—शाकाहार की मांसाहार ? मराठी थिऑ. फेडरेशन, पुणे ४; १ रु.

६३. भिडेशास्त्री श्री. ह.—ईश्वरी साक्षात्कार, गीता शांतिमंदिर, सांगली; ८० पैसे

६४. रविषेण आचार्य—जैन रामायण ( भाग १ व २ ), रूपांतर पं. जिनदास फडकुले, श्रीरामायण प्रकाशन समिति, पं. मंगळवार, सोलापूर; २० रु.

65 Tikekar S. R.—On Historiography ( A study of methods of Historical Research and Narration of J. N. Sarkar, G. S. Sardesai and P. K. Gode ), Popular Prakashan, Bombay 34 WB; Rs. 6.

प्रकाशक व मालक म. सा. परिषदेतर्फे : श्री. वि. त्र्यं शेटे, चिटणीस, म. सा. परिषद, टिळक–रस्ता, पुणे २
मुद्रक : द. वा. आंबेकर, आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, गोखले मार्ग, पुणें ४